

॥ श्री ॥






महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष सातवें ] आषाढ शके १८५६ [ अंक तिसरा

जुलई १९३४



संपादक

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए.



वार्षिक वर्गणी ट. ह. सह रु. ४-८ फुटकळ अंकास १ रु. ट. ख. निराळा






अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.
ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.
ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अधिकारी व अधिकारी मंडळें

### ट्रस्टी

प्रो. दामोदर गणेश पाध्ये, एम्. ए., जे. पी., एच्. पी. टी. कॉलेज, नाशिक
डॉ. नी. भा. भाटवडेकर, एम्. बी. बी. एस्., चर्नी रोड, मुंबई (४).

### अध्यक्ष

श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे, एम्. ए., सरस्वतीनिकेतन, इन्दूर

### उपाध्यक्ष

प्रो. वामन मल्हार जोशी, एम्. ए., हिंगणें बुद्रुक, पुणें (४).
श्री. नरसिंह चिंतामण केळकर, बी. ए., एलूएल्. बी., टिळक रस्ता, पुणें (२).
प्रो. पांडुरंग वामन काणे, एम्. ए., एलूएल्.एम्., आंग्रेवाडी, गिरगांव बॅक रोड, मुंबई (४).
श्री. चिंतामण विनायक वैद्य, एम्.ए., एलूएल्. बी., गिरगांव बॅक रोड, मुंबई (४).

## कार्यकारी मंडळ

### कार्याध्यक्ष

रा. सा. नारायण गोविंद चापेकर, बी. ए., एलूएल्. बी., बदलापूर (जि. ठाणें).

### खजिनदार

प्रि. धनंजय रामचंद्र गाडगीळ, एम्. ए., एम्. लिट्., डेक्कन जिमखाना, पुणें (४)

### चिटणीस

प्रो. देविदास दत्तात्रेय वाडेकर, एम्. ए., फर्ग्युसन कॉलेज, पुणें (४).
श्री. राजाराम दामोदर देसाई, बी. ए., ३१३ सदाशिव पेठ, पुणें (२).

### 'म. सा. पत्रिका' संपादक

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए., सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें (२).

### सामान्य सदस्य

प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए., एम्. ओ. एल्., हिस्लॉप कॉलेज, नागपूर.
श्री. कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, एम्. ए., बी. टी., मंगळवार पेठ, सातारा.
श्री. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए., महाराष्ट्र शब्दकोश कचेरी, पुणें (२).
रे. भास्कर कृष्ण उजगरे, सासवड (जि. पुणें).
श्री. केशव नारायण काळे, बी.ए.,एलूएल्. बी., 'प्रतिभा' कचेरी, गिरगांव, मुंबई (४)





अनुक्रमणिका

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरिता मुंबई सरकारने मंजूर केलेली

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ७ वें, अंक ३ रा

## अनुक्रमणिका





## साभार स्वीकार

१ असोदें:—लेखक व प्रकाशक– श्री. दत्तात्रेय गणेश काळे, संपादकीय व्यवस्थापक, ' मालवसाहित्य ', इंदूर.

२ मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास:—संपादक-- द. वि. आपटे, पुणें, प्रकाशक-अ. वि. पटवर्धन, आर्यभूषण छापखाना, पुणें, किं. ५ रु.

३ भाऊंच्या वीरकथा व पानिपत कुरुक्षेत्र वर्णन:— लेखक–शंकर पुरुषोत्तम जोशी, प्रकाशक:–भा. वा. भट, चिटणीस, रा. सं. मं. मंडळ धुळें, किंमत १० आणे.

४ शालिनीचीं निवडक पत्रें:—(खंड २ रा) संपादक व प्रकाशक– गोविंद बळवंत माकोडे, ग्वाल्हेर, किंमत १ रुपया.

५ काशी नागरी प्रचारिणी सभा:—(२१ वें वार्षिक विवरण)

६ मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें:—(४१ वा वार्षिक अहवाल) प्रकाशक सिताराम महादेव अभ्यंकर, चिटणीस म. ग्रं. ठाणें.

७ ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचा ४१ वा वार्षिक समारंभ अध्यक्षीय भाषण.

८ ज्ञानेश्वर–दर्शन:—(भाग १ व २) संपादक व प्रकाशक– रा. ब. न. बा. देशमूख, अध्यक्ष, वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर, किंमत ६ रुपये.

९ आर्यसंस्कृति:—[श्रौताचार्य, धुंडिराज गणेश दीक्षित बापट, सोमयाजी, पांचवडकर यांचीं सहा प्रवचनें] संग्राहक– चिंतामण गोविंद जोशी, एम्. ए., एल्एल्. बी., बी. कॉम्, प्रकाशक–महादेव पांडुरंग नेने, बी. ए., एल्एल्. बी., रावपुरा, बडोदें. किंमत ६ आणे.

१० डे. व्ह. ट्रा. सोसायटीचा अहवाल:—[१९३३-३४] प्रकाशक श्री. रा. भा. पाळंदे, चिटणीस, १००३ सदाशिव पेठ, पुणें २.

११ वाल्मीकिरामायण:—[सुंदरकांड]–लेखक विद्याभूषण तांबेशास्त्री, कोलधें, प्रकाशक– द. गो. सडेकर, खानापूर. किं. ६ आणे.

१२ इंदू काळे व सरला भोळे:—लेखक–प्रो. वा. म. जोशी, प्रकाशक– ह. वि. मोटे, मुंबई ४. किं. १ रु.

---

## अगत्याची सूचना

अद्याप बऱ्याच सभासदांकडून व वर्गणीदारांकडून वर्गणी येणें आहे. म. सा. परिषदेचे चालू वर्ष नव्या वर्षगणनेशी मेळ घालण्याकरितां (घटना नि. २) जानेवारी १९३४ ते मार्च, १९३५ असें १५ महिन्यांचें धरावें लागत असून यामध्ये पत्रिकेचे ४ ऐवजी ५ अंक काढावयाचे आहेत. अर्थात् या वर्षाची वर्गणी नेहमीच्या वर्गणीच्या सव्वापट म्हणजे सभासदांना रु. ४।= व वर्गणीदारांना रु. ५॥= द्यावी लागेल. ही योजना म. सा. पत्रिका वर्ष ६ अंक ३ पान १८ वर पूर्वीच प्रसिद्ध झालेली आहे. तरी वरील खुलाशाप्रमाणे वर्गणी सत्वर पाठविण्याविषयीं विनंती आहे.

परिषदेची कचेरी,
टिळक रस्ता, पुणें २

चिटणीस,
म. सा. प[illegible]



बडोदें येथील
एकोणिसाव्या साहित्यसंमेलनाचे
नियोजित अध्यक्ष



श्री. ना. गो. चापेकर
[ कार्याध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद् ]
'निर्भीड'कार यांच्या कृपेनें ]



अनुक्रमणिका



कै. बापूजी मार्तंड आंबेकर
संपादक, 'ज्ञानप्रकाश'



कै. श्री. सरदार तात्यासाहेब मेहेंदळे
एक संस्थापक, भा. इ. सं. मंडळ, पुणें.



कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर
अध्यक्ष, पुणें साहित्य संमेलन,
उपाध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद्



# आ० मि० एलिस ह्यांस मानपत्र.

ज्ञानप्रकाशकर्ते यांसः—

असे हो कां आळशा पापिष्ठासारखे स्वस्थ पुण्यास बसलां. अहो चला, धांवा मुंबईस. असेंहो काय करितां. आजच्या आगगाडींत बसा कसे आणि चला. पाहा. आजचा प्रसंग उद्यां यावयाचा नाहीं. जा जा वेड्यासारखे करूं नका. एलिसराजे जे तुमचे कर्ते प्रत्यक्ष ईश्वराचे अवतार ते किहो तुम्हास सोडून परदेशीं चालले. आणि तुमच्यानें हो पुण्यांत शुक्रवार पेठेंत बारामतकराचे वाड्यांत जेठा मारून अघळपघळ गप्पा मारीत स्वस्थपणें कसें बसवतें. शिव शिव दुनियाच कृतघ्न निघाली. तुमचा तरी काय इलाज आहे? कालाप्रमाणें तुम्हास बुद्धि. पण ह्या दुःखांत एक मात्र सुखाची गोष्ट आहे कीं, सर्वच तुमच्यासारखे अप्रयोजक झाले नाहींत. अद्याप मायचे पूत कांहीं लाल आहेत ते कृपासागर, दीन, दयाळ, परमथोर, एलिसराज ह्यांचे उपकार आठवीत आहेत व त्यांचें गीत गात आहेत. पाहा शेट मंगळदास नथुभाई, शेट जमशेटजी जिजीभाई, शेट विनायक जगन्नाथजी, शेट बायरामजी जिजीभाई आदिकरून शेट कसे वर्तताहेत ते. त्यांचें पाहून तरी तुम्ही शुद्धीवर या. अहो रामचंद्र राजे जेव्हां आयोध्येंतून जाऊं लागले तेव्हां अयोध्यावासी जन असेच तुमच्यासारखे स्वस्थ बसले होते काय? नाहीं हो नाहीं. त्यांच्यानें कसें बसवलें असतें. त्यांच्या तर डोळ्याचें पाणी खळलें नाहीं. तसे तुम्ही रडा, ओरडा. अहो आझां कोठें? एलिसराज चाललेना! खरें म्हटलें, तर तुम्ही या प्रसंगीं एलिसरूप होऊन जावें, कारण त्यांचा महिमाच तसा थोर आहे. पाहा कीं, त्यांजवाचून ह्या दुनियेंत भक्त्यार्ह कोण आहे. ईश्वर तरी ह्यांजपेक्षां विशेष पूज्य आहे काय? नाहीं नाहीं हो नाहीं. त्यांजवांचून पृथ्वी शून्यवत् भासली असती ह्यांत कांहीं संशय नाहीं. आम्हांस तर वाटतें कीं, ह्यांजसारखा ह्या दुनियेंत कोणी पूज्य नाहीं इतकेंच नव्हे तर त्यांच्या भक्तवर्गाचे शिरोमणी जे शेट मंगळदास ह्यांजवांचून त्यांच्या जवळ जवळही पूज्य कोणी नाहीं? ठीकच रामचंद्राचे मागून पूज्य कोण? हनुमान. नांव मात्र मंगळदास पण वस्तुतः म्हटलें म्हणजे 'एलिसदास' हें पद त्यांस देण्यास हरकत नाहीं अशी शेटजींची थोरवी आहे. ह्याचें नांव भक्ति, ह्याचें नांव प्रीति. नाहींतर तुमच्या पुण्यातले लोक. बेटे अप्रयोजक. त्यांस कृतज्ञता ही चीजच माहीत नाहीं. ती त्यांस माहीत करावी व ह्या प्रसंगीं एलिसराज महाराजांची थोडी बहुत तरी त्यांच्याकडून भक्ती करवावी ह्या हेतूनें हें पत्र लिहिलें आहे. तें तुम्ही छापून प्रसिद्ध करा व लाखो त्याच्या






अनुक्रमणिका

प्रती काढून ह्या इलाख्यांत चोहोंकडे फुकट पाठवा. ह्या पत्रांत त्यांच्या गुणांचें विवरण आहे व शेवटीं त्यास जें मानपत्र द्यावयाचें त्याचा आम्ही एक लहानसा मसुदा करून जोडला आहे. आमची शिफारस आहे कीं, मुंबईच्या लोकांनीही हाच मसुदा पसंत करावा. पण ही त्यांची मर्जी. आम्ही आतां शक्त्यनुसार, परमभक्ति पूर्वक, परम प्रीति पूर्वक, प्रांजल अंतःकरणानें त्यांच्या गुणवर्णनास आरंभ करतो.

जयदेव जयदेव जय एलिसराजा! अहाहा काय त्यांचे उपकार तरी आठवावे! तुमच्या हिंदु लोकांत पैसा इतका झाला आहे कीं, त्यांच्या घरांतून तो ठेवण्यासही जागा राहिली नाहीं. प्रत्येकास काळजी लागली आहे कीं, आतां ह्या पैशाचें करावें काय? तेव्हां कोणी जमिनींत पुरून ठेवूं लागला, कोणी विहिरींत ओतून ठेवूं लागला, कोणी समुद्राची पूजा करून त्यास दक्षणा म्हणून त्यांत ओतूं लागला, सारांश पैशाचा कसातरी व्यय लोक करूं लागले. देशांतील सर्व लोक ऐष आरामींत राहूं लागले. उद्योग नाहींसा झाला. चोरांनीं कंबरा बांधल्या. ह्यामुळें पोलिस लोकांस अधिक पगार देणें सरकारास प्राप्त झालें. ह्या प्रकारची एकंदर अवस्था झाली. ती पाहून आमच्या दयासिंधु एलिससाहेबांस फार वाईट वाटलें. आणि त्यांनीं मनांत आणलें कीं कसें करून तरी हा पैसा लोकांकडून काढून घेतला पाहिजे. तरच त्यांचें बरें होईल. नाहीं. तर थोड्या दिवसांत त्यांची काय दशा होईल कोण जाणे. असें मनांत आणून त्यांनीं असा कायदा काढला कीं, शहरांतून ज्या जमिनीवरून लोकांनीं घरें बांधलीं आहेत त्याची मोजणी करून त्यांबद्दल त्यांनीं सरकारास भाडें द्यावें. ह्याचें नांव चातुर्य. ह्या एका धोंड्यानें दोन आंबे पडले. एक तर लोकांपाशीं जो अतिशय पैसा सांचला आहे त्यास थोडीशी वाट सांपडली व दुसरें असें झालें कीं, सरकारची मत्ता जी जमीन ती बेटे लुच्चे रयतलोक किती वापरताहेत ह्याचा तरी अंदाज कळला. ह्यामध्येंही परस्पर या लोकांचा फायदा झाला. पण ह्या कायद्यापासून इतकाच फायदा झाला असें नाहीं, तर आणखीही झाला आहे. तो कोणता म्हणाल तर ऐका. तुमच्या हिंदु लोकांस व विशेषेंकरून ब्राह्मणांस असें झालें आहे कीं, केव्हां एकदां साहेब, महार, मांग आमच्या स्वयंपाक घरांत, देवघरांत बूट घालून येतील, आमच्याशीं बोलतील, चालतील, आमच्या पंक्तीस बसतील. ह्याप्रमाणें त्यांस नाद लागला आहे. दररोज सकाळच्या प्रहरीं ब्राह्मण उठून म्हारवाड्यांत जातात व तेथील राजमान्य राजश्री रोंग्या वल्लद पोंग्या ह्यास म्हणतात "रोंगोजीपंत, आज आमच्या घरीं, आमच्या पंक्तीला स्वयंपाक घरांत बसून भोजन करण्यास या." पण रोंगोजीपंत कोठें येतात. ते साफ येत नाहीं म्हणतात आणि त्या बिचाऱ्या ब्राह्मणास दीनवाणी तोंड करून परत यावें लागतें. तेव्हां ही त्यांची निराशा होऊं नये व त्यांचे मनोरथ पूर्ण व्हावे म्हणून दयेचें घर व सर्वांच्या मनकामना पूर्ण करणारे एलिसराज ह्यांनीं एक युक्ती काढली. त्यांनीं सांगितलें कीं, "भक्तहो तुम्ही इतके घाबरलां कां. तुमचे मनोरथ मी पूर्ण करतों. आमचे साहेब लोक व दुसरेही अन्य जातीचे लोक मोजणीच्या मिषानें तुमच्या घरांत येतील व








अनुक्रमणिका

तुमचीं घरें पवित्र करतील. कांहीं काळजी करूं नका. इतकें मात्र करा कीं, येण्याच्या पूर्वीं कांहीं वेळ अमक्या घटकेस आम्ही येणार असें ते तुम्हास कळवतील तितक्या वेळांत त्यांचें आदर आतिथ्य नीट ठेवण्याची तजवीज करा म्हणजे झालें." अहाहा! ह्यापेक्षां थोर उपकार ते किती असावे! एलिसराज महाराजा तुम्हांप्रत वंदन असो. पण इतक्यानेंच संपलें नाहीं. आणखी एक दोन कायदे करण्याच्या प्रसंगींही ह्या साहेबांनीं रयत लोकांवर फार फार मेहेरबानी केली. सरकारी चाकर नेमावयचे ते तरी कांहींकांच्या सांगण्यांत कसे नेमावयाचे म्हणाल, तर लोकांस सुख देणारे, चांगले, ज्यांच्या अब्रूस तिळमात्रही कलंक नाहीं, जसे श्रीधर विठ्ठल. असा एलिस महाराजांचा पाठ. कामगार आपल्या कामावर रुजू झाला कीं, लागलेच लोक रडायाला! धन्य धन्य एलिसदेवा! पण फार लांब जाणें नको, असें आम्ही त्यांच्या गुणांचें वर्णन करीत बसलों तर एक ग्रंथही पुरणार नाहीं. त्यांजकडे कोणी जावो त्याच्याशीं ते बोलायचेच. नेटिवांच्या म्हणजे तुमच्या लुच्चेगिऱ्या समजणारे तर काय पहिल्या प्रतीचे! त्या नसल्या तरी त्यांस दिसावयाच्या ह्या जसा त्यांचा बाणाच. पण पुरे पुरे आतां काय करावें! ह्या साहेबांच्या गुणांच्या विवरणांत गुतलों असतां पुरे करीन म्हटलें तर लेखणीच थांबत नाहीं. असो, आतां मानपत्राचा मसुदा जोडतों.

## मानपत्र.

राजाधिराज, दयानिधे, कृपासिंधो, भक्तवत्सला, दीनदयाळा, नेटिवपुरुषकल्याणकारा एलिस साहेब महाराजा,

तुम्हाप्रत आमचें वंदन असो. तुमचे उपकार आमच्यावर डोंगरा येवढे आहेत. ते आम्ही जन्मजन्मांतरीं विसरणार नाहीं. जेणेंकरून म्हणून आमचें कल्याण होईल असें एकही काम आमच्याकरतां करण्याचें आपण सोडलें नाहीं. आमच्यापाशीं अतिशय द्रव्य झालें तेणेंकरून अनेक दुष्ट परिणाम घडूं लागले त्यांचें आपण निवारण केलें. आमच्या घरांत आपण साहेब घातले. तसेंच दुसरेही आणखी इतके उपकार आहेत त्यांची नुसती यादच इतकी लांब होईल कीं, ती पसरली असतां सर्व पृथ्वीलाही अच्छादन पुरेल. ह्या सर्व गोष्टी मनांत आणून आमच्यानें आपल्या विरहाचें दुःख सोसवेल असें वाटत नाहीं. तेव्हां एक आपण तरी जाऊं नका अगर आम्हास तरी आपणाबरोबर घेऊन चला. आपण असें न कराल तर आपल्या गळीं पडून आम्ही येऊं. येथें तरी आमचें काय आहे? जिकडे आपण तिकडे आम्ही. असें करण्याचा आम्ही निश्चय केला आहे.

आपले परम आज्ञा धारक भक्त

**मंगळदास नथुभाई आदीकरून मुंबईचे थोर लोक**

तारीख २४ मार्च १८६९

आपला मित्र,

**एक पिशाच**








अनुक्रमणिका

## पत्र ४ थें

Vol. 21. ] ज्ञानप्रकाश १७-६-१८६९ [ No. 20

# बोडकीला दोन कुंकांची उठाठेव.

**ज्ञानप्रकाशकर्ते यांस :—**

कां महाराज कसें काय आहे ? ठीक आहे नां ! तब्बेत यथास्थित आहे नां ? अजीर्ण विजीर्ण तुम्हांस कांहीं झालें नाहीं नां ? झालें असेल तर दररोज दहापांच हिंगाष्टकाच्या गोळ्या खाऊन लवकर जठराग्नि प्रदिप्त करा बरें, नाहींतर पुढें पंचाइत पडेल. पंचाइत ! पंचाइत कशाची हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. अहो, आतां तूपपोळ्या झोडायाच्या आहेत ना रावबहादुर **मोरोबा कान्होबांच्या** येथें. "मागून पुढून बाप नवरा" ह्याप्रमाणें रावबहादुरांची स्थिति झाली आहे. म्हातारपण झालें तरी अद्याप नवरा होण्याची त्यांची इच्छा आहेच आणि तेंही नवरा कोणाचा म्हणाल तर विधवेचा. हहहहा विधवेचा नवरा ! आजपर्यंत आम्ही बोडकीस कुंकाची उठाठेव नसते असें ऐकत होतों पण बोआ तें खोटें ? बोडकीस दोन कुंकांची उठाठव. एक पहिल्या आणि एक दुसऱ्या. इतके दिवस आम्हास असें वाटत होतें कीं, विधवेचें कपाळ व कुंकूं ह्यांचें विलक्षण वैमनस्य आहे पण तसें कांहीं नाहीं. त्या दोन पदार्थांचा फारच स्नेह आलीकडे झाला आहे. बरें झालें बोआ कोणाचेंही वांकडें नसावें. पहा कीं, ह्या मिलाफापासून अनेक फायदे होतील त्यांत संशय नाहीं. एक तर बांगड्या विकणारे कांसार व दुसरे कुंकवाले ह्यांच्या जिनसांचा अधिक खप होईल. व त्या बिचाऱ्यांचीं पोटें चांगलीं चालतील. दुसरा फायदा असा आहे कीं, कांहीं बोलायाचा सोय नाहीं. त्या फायद्याकरितां पाहिजे तें नुकसान सोसावें अशी त्याची योग्यता आहे. तो कोणता म्हणाल तर ऐका. अहो ज्या कित्येक दैवशाली पुरुषांच्या पहिल्या बायका मरतील त्यांस ह्यापेक्षां दुसऱ्या बायका अधिक मजेदार मिळतील. ठीकच चांगली रुळलेली व वहिवाटलेली सडक कोऱ्या सडकेपेक्षां चालण्यास विशेष सुखावह हें उघड आहे. कोऱ्या नव्या घरापेक्षां वापरलेलें घर चांगलें, कारण त्यांत नांदणारास तें यशस्कर व धार्जिणें होतें अगर नाहीं ही त्याची परीक्षा झालेली असते. तद्वत् कुमारिकेपेक्षां विधवा चांगली, रुळलेली असल्यामुळें अधिक मजेदार व मारू ह्यांत कांहीं संशय नाहीं. त्यांतून ती दहापांचदां विधवा झालेली असली तर मग तिजशीं विवाह करणें तर फारच सुखावह खरें. असो ह्या विधवाविवाहापासून बहुत फायदे आहेत हें आम्ही सांगण्याची गरज नाहीं. असें करणें हा आमचा वेडेपणा

१ "घाशीराम कोतवाल" (१८६३) या कादंबरीचे कर्ते. अहमदनगर येथील स्मालकाज कोर्टाचे जज्ज.








अनुक्रमणिका

होय; कारण तुम्ही तर त्यांतील दीक्षित. तुमचें म्हणणें असें आहे कीं, लोक बेटे भित्रे विधवाविवाह चांगला म्हणतात आणि कोणी करीत तर नाहींत. हें ऐकून रावबहादुर मोरोबा कान्होबा ह्यांस फार त्वेष आला; कारण अहो हा दोष फार दुःसह होय. कोडताच्या कामांत कोणी विक्षिप्त, आर्ष म्हटलें तरी चिंता नाहीं, पण बोडकीचा नवरा होण्यास ह्या मार्गे सरतो असें म्हणून घेण्यासारखें कठीण दुसरें कांहीं नाहीं. हें रावांनीं मनांत आणलें. इतक्यांत ईश्वरकृपेनें त्यांची पहिली बायको मेली. बहादुरांनीं विचार केला कीं, बरें झालें जुनी खट एकदां गेली. आतां ह्या प्रसंगाचा उत्तम उपयोग करून घेतला पाहिजे. असें मनांत आणून त्यांनीं तें करण्याचा प्रयत्न आरंभिला. तो कोणत्या रीतीचा हे खालीं सांगतों.

अहो तुमच्यांत अलीकडे कांहीं " इजनेर " का " फिजनेर " म्हणून लोक असतात. ते कोण म्हणाल तर आमच्यांतले बढाई. त्यांच्या मनांत आलें कीं, अमुक वाडा अगर दुसरें कांहीं काम बांधावयाचें तर ते तुमच्या वर्तमानपत्रांत लोटीस देतात कीं ज्यांस चुन्याचें, मातीचें, विटांचें वगैरे दुसऱ्या हरएक जिनसांचें कंत्राट ध्यावयाचें असेल त्यानें अर्ज पाठवावे व अमुक दरानें कंत्राट घेण्यास मी खुषी आहें असें त्यांस लिहावें. ह्या मार्गानें त्यांच्याकडे बहुत अर्जा आल्या म्हणजे त्यांस हव्या त्या मनुष्याची त्यांतून निवड करतां येते. मग ते त्याजशीं करार करून कामास सुरवात करतात. हा मार्ग फार उत्तम होय, सबब रावांनीं त्याचें अवलंबन केलें आहे. त्यांच्या मनांत आलें कीं, बोडकीशीं लग्न करावें. त्याबरोबर अमुक कंत्राट आमच्यापाशीं द्यावयाचें आहे तें कोणाची घेण्याची इच्छा असेल तर तिनें ध्यावें अशी त्यांनीं वर्तमानपत्रांत लोटीस दिली. त्यांतील करार येणेंप्रमाणें:—

जसें तुम्ही आम्हास अमुक खंडी चुना अमुक दिवसांत द्यावा हा करार तसा तूं मरेतोंपर्यंत अगर आम्ही मरेतों पर्यंत आमची कामशांती करावी हें विधवेशीं कंत्राट. तितके दिवस आमची कामशांती त्वां केली म्हणजे आम्ही तुला पेणसल देऊं, असाही त्यांत करार आहे. यंवरे! बहादूर!! काय औदार्य पाहा. नाहींतर 'चाकरी तोंवेरी भाकरी' असें असावयाचें; पण राव म्हणतात आम्ही असे नव्हे. आमच्या कामशांत्यर्थ ज्या पदार्थांची गरज आहे तो तुम्ही पुरवितां आहां तोंपर्यंतच तुम्हास रोजमुरा मिळेल असें नाहीं तर पुढेंही थोडाबहुत मिळेल. पण आणखी एक विसरलों. कामशांत्यर्थ जो पदार्थ पाहिजे तो असा पाहिजे कीं, त्यावर कोणाचा वारसा नसावा. असा त्यांचा मानस आहे. अहो दुभती गाय असली म्हणजे तिच्या दुधावर यजमानाचाच वारसा असतो असें नाहीं तर तिच्या वासराचाही असतो ह्यामुळें यजमानाचें नुकसान होतें. सबब बहादुरांनीं सांगितलें आहे कीं, आम्हांस दुभती वासरेंवाली बोडकी नको. असो रावबहादुरजी स्पष्ट वक्ते व व्यापाराला मोठे शिधे खरे. कंत्राट देतेवेळीं आपणही कसर द्यायचे व दुसऱ्याचे ध्यायचे. सरळ कारभार. हें पाहून व पेणसलाच्या आशेनें त्यांच्याकडे किती विधवा येतील कोण जाणें? त्यांनीं आपलें घर अंमळ मोठें करावें



म्हणजे फारशी दाटी होणार नाहीं अशी आमची त्यांस शिफारस आहे. कारण आम्हांस वाटतें कीं खालीं लिहिल्याप्रमाणें एकादे दिवशीं मौज होईल ह्यांत संशय नाहीं.

एकाद्या रविवारीं शेंपन्नास विधवा कोणी सकेशा, कोणी तिढ्याची **लेखणी डोक्यावरून फिरलेल्या** अशा फक्कड बनून, नटून, थटून, त्यांच्याकडे येतील. मग अर्थातच ते त्यांस आदरसत्कारानें थोरल्या दिवाणखान्यांत बसवून आपण अध्यक्षस्थानीं बसतील. अहाहा विधवाधिपती कसे ते विराजमान होतील! मागें पुढें बाजूनें जिकडे पहावें तिकडे विधवाच विधवा अशी गम्मत होऊन जाईल. मग बहादूर सर्वांकडे न्याहाळून पाहतील व त्यांतील कांहीं निवडून काढून बाकीच्यांस लावून देतील; कारण पडले स्पष्टवक्ते व व्यापारास शिधे. एकीस म्हणतील तुझें नाक **आखें** आहे. तूं आम्हास नकोस जा. शिपायी हीस रस्ता दाखीव. दुसरीस म्हणतील तूं तर भाडेकऱ्याच्या घोड्याप्रमाणें नाळ पडलेली दिसते आहेस. तूं जा. तिसरीस म्हणतील काय आली कंत्राट घ्यावयास. स्त्रियांचे अवयव तर तुजवर दिसतच नाहींत. मी आहे इस्माल कोर्टाचा अधिकारी म्हटलें. मी तुझें पाणिग्रहण करीन हें तुझ्या मनांत आलें तरी कसें. इष्टुपिड, जा. चवथीस म्हणतील कीं, तूं तर जहाजासारखी भली धटिंगण दिसते आहेस. बाहेर जसें आमचें इस्माल कोर्ट आहे तसेंच घरांतीलही आम्हास इस्माल कोर्टच पाहिजे. तूं नकोस आम्हास जा. ह्याप्रमाणें ज्या आपणास नकोत त्यांस घालवतील. पण इतक्या वेळांत बाकी ज्या राहिलेल्या आहेत त्यांस दिसेल कीं, बोलण्याबिलण्यांत रावबहादूर कडक आहेत खरे पण केंस तर सर्व पांढरे झालेले आहेत. आपण नव्या तरण्या. आपण ह्यांची कामशांती करण्याचें कंत्राट घेणार खरें पण ह्याजपाशीं तो आतां फारसा राहिला असेल असें दिसत नाहीं सबब ह्याजबद्दल त्यांजपाशीं सर्टिफिकिटें असतील तर पाहावीं. असा विचार करून त्या रावबहादुरापाशीं सर्टिफिकिटें मागूं लागतील. ह्याकरितां आमची त्यांस अशी शिफारस आहे कीं, इतक्या स्थितीस येण्याच्या अगोदरच आपणापाशीं जीं सर्टिफिकिटें 'असतील तीं त्यांनीं आपल्या लोटिशींत दाखल करावीं. व नसतील तर तीं नवीं मिळवून दाखल करावीं. त्यांच्या लोटिशींत येवढें कमी आहे. बाकी सर्व ठीक आहे. ह्याजबद्दल आम्हास आणखी लिहिणें आहे तें पुढें लिहूं. कळावें,

आपला मित्र,
**एक पिशाच**

## पत्र ५ वें

Vol. 21 ] ज्ञानप्रकाश ३ मे १८६९ [ No. 18

**ज्ञानप्रकाशकर्ते यांस :—**

आतांच्या तुमच्या वाचणारांस मराठी समजण्याच्या नांवानें आंवळ्या येवढें शुन्यचना! हो तर दुसरें काय म्हणावें! अहो एक जण गृहस्थ म्हणतात कीं, "विरह शब्दाचा" उपयोग म्हणजे प्रयोग केवळ स्त्रीपुरुषांच्या व्यवहारांतच करतात असें








अनुक्रमणिका

असतां " पिशाच " ह्यांनीं त्या शब्दाचा प्रयोग एलिसराज महाराजांच्या संबंधानें केला आहे हें कसें! यंरे! मराठीचें ज्ञान! एकून सीमा झाली बोआ! ह्याच्यावर उत्तर द्यावयाची आपली तर छाती नाहीं खरी, परंतु ह्या शहाण्या गृहस्थांस आमची विनंती आहे कीं, ह्या खालील वाक्याचा अर्थ काय आहे हें त्यांनीं सांगावें म्हणजे आम्हीही त्यांच्या प्रश्नाचें उत्तर देऊं.

होनाजी बाळाची जी " घनश्याम सुंदरा " म्हणून जी भुपाळी आहे तीमध्यें शेवटीं असें एक वाक्य आहे, " हे माझे पाडसे सांवळे उठ कृष्णाबाई " ह्याचा अर्थ कृष्ण बायको होता असा काय ?

आपला मित्र

**पिशाच**

## पत्र ६ वें

Vol. 22] ज्ञानप्रकाश १ जानेवारी १८६९ [No. 2

## भडोच येथील लाथांचा सुकाळ

॥ घेईं घेईं माझे वाचे गोड नाम हुपोबाचें ॥
॥ करीं मस्तक ठेंगणा लागें हूपाचे चरणा ॥
॥ जरी व्हावी तुजथोरी तरी मर्कट सेवा करी ॥
॥ जरी व्हावे तुज हाल तरी पाहा होप बाल ॥

**ज्ञानप्रकाशकर्ते यांस :—**

कसें काय आहे ? स्वारी आपली भडोचास गेली असेलच. हो हो हें काय विचारावें! न जाऊन कसें होतें! प्रदर्शन आणि तुमच्या सारखे ज्ञानाचे हिलाल तेथें नाहींत असें होईल तरी कसें ? अशा स्थलीं न जाणें म्हटलें म्हणजे प्रायश्चित्त घेण्यासारखें पातक होय ह्यांत संशय नाहीं. अहो काय त्या प्रदर्शनाची थोरवी सांगावी! जेथें शेंकडों चिजा, सुंठ, जिरें, मिरें, कापूस, मीठ, कुत्रीं, गाढवें, मोटा, नांगर, वाळाच्या शेंगा, घेवड्याच्या शेंगा आणि तेथें चैन मारावयास व त्या सुंदर, अपूर्व चिजांचें कौतुक पहावयास न जावें तर जावें तरी कोठें ? जेथें टोपी, कुडती, आणि पाटलून ह्यांनीं शोभायमान झालेल्या अदल्या जन्मींच्या रामसीता भक्तांचा समुदाय तेथें न जावें व त्या महाभागांच्या पदाचे रजःकण आपल्या शिरावर घेण्याचें अंतरावें मग जन्माचें सार्थक तें काय ? ठींकच आहे. ते रजःकण ज्याचे डोक्यावर पडले नाहींत त्यास स्वर्गाचीं दारें बंद. त्याच्या बूटरजःकणाचा व आपल्या शिराचा एकदां यत्किंचित् संबंध झाला पुरे कीं स्वर्गाचीं दारें खुलीं होऊन उलटीं " आपण आंत या " असा तींच आग्रह करतात. ही शक्ति हरिनामामध्यें अगर मोठ्या दानधर्मांतही नाहीं.








अनुक्रमणिका

हिंदुशास्त्रामध्यें अत्युत्तम जो धर्म असेल त्याचें आचरण केलें असतांही स्वर्गलोकीं येण्याचा ईश्वर आग्रह करीत नाहीं. परंतु साहेब चरणीं एकदां मस्तक लीन केलें कीं, देव जसा पाठीस लागतो. मग स्वर्गलोकीं नेल्यावांचून कधींही तो सोडीत नाहीं. एकदां साहेबाचे बूट खाल्ले कीं, झालों देवाचे जसे जांवई. लेंक द्यावी आणि जांवयाला आयुष्य चिंतावें ह्याप्रमाणें देवाची स्थिती होते. साहेबांची लाथ ही आपली कन्या ईश्वरानें एकदां दिली कीं, लागला तो आपल्या सेवेला. मग काय विचारतां चैन. त्यानें म्हणावें, "या महाराज, सर्व सुखाचें स्थान जें स्वर्ग तेथें या, आपणाकरितां सिंहासन तयार आहे." आपण म्हणावें. "चल चल येत नाहीं जा." शेवटीं मोठ्या मेहेनतवारीनें त्यानें घेऊन जावें. तुम्ही कितीही स्त्रीहत्या करा, बालहत्या करा, जें पाहिजे तें करा आणि एकदां बूट रजःकण आंगावर पडूं द्या म्हणजे मागें केल्या पातकाचा ऱ्हास होतो इतकेंच नव्हे तर पुढें जीं करणार त्यांचाही होतो. ह्याप्रकारची त्या रजःकणाची योग्यता आहे. बरें त्यांच्या आंगीं दुसरा एक गूण आहे तो जे दुसरे स्वर्गप्राप्तीचे मार्ग म्हणून लोकांत प्रसिद्ध आहेत त्यांच्यांत मुळींच नाहीं. दुसऱ्या रीतीनें स्वर्गप्राप्तीच्या मार्गास लागणें म्हणजे इहलोकींच्या सर्व सुखांचा परित्याग करणें होय. ईश्वरप्राप्तीच्या खटपटींत जो लागला त्यास येथील थोरपणा सोडावा लागतो. पण ह्या मार्गाचें तसें नाहीं. येणेंकरून परलोकप्राप्ति जांवई डौलानें होते इतकेंच नव्हे तर येथेंही थोरवी मिळते. साहेबांचे बूट खाण्यासारखी प्रतिष्ठा कशांतच नाहीं. ह्यामुळेंच तर मोठ मोठे लोकही त्याकरितां प्राण टाकीत असतात व झटत असतात. लेजिस्लेटिव कौन्सिलदारीही मिळाली तरी त्यांत प्रतिष्ठा नाहीं. एकदां होप साहेबांचा अगर हाग साहेबांचा "टर" अगर "डर" शब्द ऐकला पाहिजे. त्यांनीं एकदां "तुला चौकीर बसवीन" असें म्हटलें म्हणजे कृतकृत्य झाले. मग सुखालं माघारी यावें. इहलोकीं व परलोकीं थोरपणा मग घर चालून आलाच. कितीही श्रीमंती असली, आपल्या वडिलानीं कोट्यावधि रुपये दानधर्मांत व दुसऱ्या अनेक प्रकारच्या उत्तम कामांत खर्च करून विलक्षण यश संपादन केलें असलें तरी उपयोग नाहीं. त्यांत थोरपणा नाहीं. तर अगदीं उत्कृष्ट प्रतीचा थोरपणा कशांत आहे म्हणाल तर इंग्रजांनीं आमच्या "बालांत"[१] येऊं नका म्हणावें आणि आपण म्हणावें "येऊं द्याहो येऊं द्या महाराज, तुमच्या बालावांचून माझे प्राण जातात, तुमच्या बालांत मला व माझ्या मुलीबाळींना न येऊं द्याल तर मजसारखा हतभाग्य, अनाथ कर्मचांडाळ असा कोणी नसेल. कसेंही करा पण मला येवढी भिक्षा घाला. जर माझी प्रार्थना न ऐकाल तर मी सर्वस्वी बुडालों असें समजा." असें आपण म्हणावें मग त्यावर त्यांनीं म्हणावें "जाव, जाव, टूमची लायकी नाही आमच्या बालामंदि येन्याची. आमी सांगते तूं जा आनि तूं कशाला जात नाहीं. साहेबाचें डोकें कशाला गरम करते. तुला शरम नाहीं. मडम लोक बालामंदि येईल आनि तेथें काला लोक आमी कशाला येईल

१ Ball—एक इंग्रजी नृत्यप्रकार.








अनुक्रमणिका

" इतकें जरी त्यानें म्हटलें तरी आपण म्हणावें, "महाराज असें करूं नका. कांहीं दया करा. मी लक्षाधीश आहें, मी लेजिस्लेटिव कौन्सलांत आहे, मी यूरोपांतील सर्व मोठमोठ्या दरबारांतून फिरलों आहें. तुमच्या पायां पडतों. साहेब आपण मायबाप. आपण असें टाकून दिलें तर आमचा अंगिकार कोण करील ? नकाहो महाराज असे लोटून देऊं. " असें आपण म्हटलें, म्हणजे साहेब म्हणतीलच कीं, " तूं जा तूं कशाला येथें बसते. साहेब आपली प्रकृति राखूं शकत नाहीं." तुझें बोलणें ऐकून 'जाव, शिपाय हकाल देव ' असें एकदां साहेबांनीं म्हटलें, झालें आपलें काम. मग ह्या पृथ्वीत ........ मिळालें, मग आपल्यापेक्षां कोणी थोर राहिला नाहीं. मग खुशाल घरीं जाऊन मला साहेब असें बोलले. माझ्यासारखा दैवशाली पुतळा कोणी नाहीं. ह्याप्रकारचे मांडे खात निजावें. अशी बूट रजःकणाची थोरी आहे. तेव्हां आमच्या नेटिव गृहस्थांनीं भडोच येथें जी वर्तणुक केली ती फार वर्णनीय होय. त्याप्रमाणें इंग्रजांनीं केली तीही वर्णनीय होय हें आम्ही पुढील पत्रीं दाखवूं. प्रस्तुत थांबतों. गुडमार्नी शेखांड.

आपला मित्र

**एक " पिशाच "**

## पत्र ७ वें

Vol. 21] ज्ञानप्रकाश १ फेब्रुवारी १८६९ [No. 5

## अग्निरथाचा कहर

**ज्ञानप्रकाशकर्ते यांसः—**

ठीक आहेनां, अग्निरथाची कशी काय हकीकत आहे ? तुमच्या कारखान्यापैकीं तर कोणास कांहीं प्रसाद मिळाला नाहीं नां ! नसला तर मग ठीक आहे. मग चालूं द्या इंग्रजाची स्तुति. पत्रकारशेट, एकूण प्रस्तुतची तुमची नामी सुधारणा खरी. तारायंत्र व आगगाडी सारखीं तिचीं फलें. आहाहा, काय त्या फलांची तरी योग्यता वर्णावी. पहा त्यांचा ह्या जगावर उपकार किती आहे तो. अहो आमच्या ऐकण्यांत आहे कीं, एका मोठ्या शहाण्या, चतुर विद्वान् इंग्रज पंडितानें असा सिद्धांत ठरविला आहे कीं, ह्या दुनियेंतील मनुष्यें भूमितिप्रमाणानें वाढतात म्हणजे पहिलीं दोन असलीं तर त्यांचीं चार होतात, चोहोंची आठ होतात आठाचीं सोळा होतात, ह्या प्रमाणें सपाटा चालतो. पत्रकर्ते रावजी, ह्याचा परिणाम काय होईल तो पहा. एकाद्यास मूल झालें म्हणजे मोठा आनंद होतो, त्याच्या आईबापांस आपण कृतकृत्य झालों असें वाटतें, तीं साखरा वाटतात. हें सर्व मोठें गोजिरवाणें दिसतें खरें, पण जरा दूर दृष्टी करून पाहा. ह्या क्रमाची अखेर काय होणार ती. अहो कांहीं काळानें ह्या पृथ्वीच्या पाठीवर अनंत मनुष्यें होतील. म्हणजे अर्थातच त्यांस खाण्यासही मिळणार नाहीं. जिकडे पहावें तिकडे दरिद्र, दुर्दशा असें होईल. ज्या ह्या हिंदुस्थानांत






अनुक्रमणिका

लक्ष्मी वास करीत होती तेथें त्यांच्या आका राज्य करूं लागतील. एकंदरींत ह्या हालांसारखे हाल नाहींत असें होऊन जाईल. तेव्हां ते न होण्याची तजवीज करणें म्हणजे ह्या हिंदुस्थानवर तर काय पण एकंदर मनुष्यजातीवर उपकार करण्यासारखें होय. अहो पूर्वी लढाया होत असत, खाऱ्या होत असत, त्यावेळेस मनुष्यें आपोआप कमी होत, अखेरची दुर्दशा येण्याचें तितकें लांबे. पण आतां तसें कोठें आहे ? लढाई म्हटली म्हणजे लोक कानावर हात ठेवतात. पुरुषांत व बायकांत मोठासा फरक राहिला नाहीं. ही तुमची सुधारणा अद्याप पूर्णत्वास आली नाहीं तोंवरची स्थिति. ती एकदां पूर्णत्वाप्रत पावली म्हणजे तर काय विचारावयाचें आहे ? मग कासाराची चैन. आज तर बायकांतच त्या त्या मालाचा खप होतो पण मग पुरुषांतही होऊं लागेल अशी आमची पक्की खात्री आहे. ह्या बुद्धिनेंच इंग्रजराज ×—×—× पण असो तें; तात्पर्य इतकेंच कीं, पूर्वी लढाया वगैरे होऊन मनुष्यें कमी होत होतीं तो उपाय राहिला नाहीं तेव्हां इंग्रज राजास मोठी काळजी पडली. मग काय पुसावें ! त्यांच्यापाशीं युक्तीस कांहीं कमी आहे ! युक्तीची खाणच त्यांच्यापाशीं आहे. त्यांतून काढली त्यांनीं एक नामी, सुंदर युक्ति. ती तरी कशी कीं, मनुष्यें मारलीं असा दोष तर कोणावरही येऊं नये आणि मनुष्यें तर शेंकडों मरावीं. ह्याप्रमाणें युक्ति काढून आलीकडे ती चालू केली आहे. ती कोणती म्हणाल तर आगगाडी बाई कडून 'अपघात' करवावा आणि टाकावा माणसांचा चेंदा करून. द्वाड माणसें, बेटीं भूमितिप्रमाणानें मुलें उत्पन्न करणार नाहीं, तुम्हीं दुनियेवर कद्दर गुजरविणार नाहीं, तुम्हींच गाशा गुंडाळा कसे आणि जा अन्य लोकांस. मग तेथें भूमितिप्रमाणानें मुलें करा नाहींतर आणखी अधिकही करा. आमच्या येथून तोंड काळें करा म्हणजे झालें. ह्याप्रमाणें वहिवाट इंग्रज राजानें ठेवली आहे. पाहा बरें केवढा त्यांचा तुम्हावर उपकार आहे. जसजसें ह्या युक्तीकडे अधीक पाहावें तसतशी तिची थोरवी अधीक दिसूं लागते. पाहा कीं, दर दोन वर्षांनीं अगर चार वर्षांनीं अगर दहा वर्षांनीं एक शंभर अगर हजार मनुष्यें समुद्रांत लोटून द्यावयाचीं. अगर फाशीं द्यावयाचीं अगर विष घालून मारावयाचीं अशी कांहीं तुमच्या राजानें तोड काढली असती तर बरें किती हाहाःकार झाला असता. एक तर राजा दुष्ट, चांडाळ असें म्हणून लोकांनीं कदाचित् बंडें केलीं असतीं व त्याच्या ऐश्वर्यास व सुखोपभोगास पंचाइत पडली असती. दुसरें असें कीं, अशी मनुष्यें मारण्याची वेळ आली म्हणजे तीं आपला जीव घेऊन पळून गेलीं असतीं व मृत्यूस त्यांनीं आपली नाखुशी दाखविली असती. पण ह्या युक्तींत कशी गम्मत आहे ! दुष्ट चांडाळ कोणीच नाहीं. अपघात झाला त्याला कोणाचा उपाय आहे ? आतां नेहमीं अपघात कोठून आणावे ही पंचाइत होतीच. पण त्यालाही एक युक्ति त्यांनीं काढून ठेवली आहे. बाटलाजीच्या साहाय्यानें पाहिजे तेव्हां पाहिजे तितके अपघात करतां येतात आणि तिच्या अमलांत पाहिजे तें केलें असतां दोष नाहीं हा तर त्यांचा धर्मशास्त्रांतील प्रसिद्ध सिद्धांत आहे. ह्या प्रकारानें कोणावर दोष








अनुक्रमणिका

येत नाहीं. बरें लोक तरी नाखुषीनें जातात काय? नाहीं. मौजेनें, हुरुपानें, हौसेनें, पैसे देऊन, धक्के खाऊन, साहेबबूटरजःकणांचें सेवन करून जातात आणि बोरघाटांत अगर थळघटांत अगर दुसरें कोठें एकादें सोयीचें ठिकाण पाहून आपला प्राण सोडून देतात, आणि असें करण्यांत त्यांचा फायदाही आहे. एकाद्या घरांत बिछान्यावर पडून प्राण सोडला म्हणजे ह्या प्राणास वर जाण्यास पंचाईत पडते. आधीं एक घराच्या बाहेर पडावयाचें, मग शहराच्या बाहेर पडावयाचें, आणि मग वर जावयाची वाट शोधावयाची. आगगाडीचें तसें नाहीं. तिची पुण्याई, तिचा महिमा असा आहे कीं, तिच्यांत बसून ज्यानें प्राण सोडला त्यास काशीस प्राण सोडल्याचें श्रेय येतें. प्राण एकदम जो उठतो तो परमेश्वराजवळ जातो. सारांश मनुष्यें कमी करून शेवटचा दरिद्राचा प्रलय न येऊं देण्याची ही युक्ती तुमच्या राजानें फारच नामी काढली आहे. सबब त्यांचे उपकार मानणें अवश्य आहे. नमस्कार राजे बहादर.

आपला मित्र

**एक " पिशाच "**

## पत्रं ८ वें

Vol. 21 ] ज्ञानप्रकाश २४ मे १८६९ [ No. 21

### रा. रा. वर्तमान दीपिकाकर्ते यांस.—

वि. वि. महाराज, लिहावयास कारण कीं, आमच्या ज्ञातींतील एक थोर गृहस्थ रावबहादूर मोरोबा कान्होबा, बाळाजी विजयकर यानीं जी एक जाहिरात लावली आहे, त्या जाहिराती अन्वयें रावबहादुरांस मी माझा अर्ज आपल्या वर्तमान दिपिके द्वारें पाठवूं इच्छितें. तर पत्रकर्ते महाराज, तो छापून प्रघट करण्याविषयीं, आपण अवश्य मेहेरबानी करावी.

श्री सूर्यवंशी क्षत्रीय पत्तन परभू ज्ञातींतील कैलासवासी * * यांची मी सून आहें. माझ्या भ्रताराचें नांव राजमान्य राजश्री * * आहे. मला वैधव्य प्राप्त होऊन आज सुमारें पांच वर्षें होत आलीं. हल्लीं माझें वय सुमारें पंचवीस वर्षांचें आहे. वैधव्य दशेचीं पांच वर्षें फारच दुःखानें काढलीं. परंतु मागील आठवड्यांत आपल्या सहीचा जाहीरनामा वर्तमानदीपिका पत्रांत वाचून तें पांच वर्षांचें दुःख पांच मिनिटांत विसरलें. कारण आपणासारखे थोर, कुलीन, मोठा हुद्दा चालविणारे व मोठा पगार कमावणारे यांच्या सारख्यांनीं आम्हासारखे दीन प्राण्यांची दया जाणून ज्यापेक्षां पुनर्विवाहास कंबर बांधली आहे त्यापेक्षां आतां आमच्या सुखास पार नाहीं.

असो, आपण सूज्ञच आहां त्यापेक्षां आपणांस फार लिहिणें नलगे. परंतु विवाहाची तजवीज कोणते रीतीनें व्हावी याविषयीं आपणास थोडी सूचना करितें;

१ हें पत्र ४ थ्या पत्रासोबत वाचावें.








अनुक्रमणिका

व त्याप्रमाणें आपण सिद्धता केल्यास माझे वाडवडील आपणास माझें दान करायास एका पायावर सिद्ध आहेत असें आपण खात्रीपूर्वक समजावें.

## सिद्धतेचें साहित्य.

१ आपल्या काळका देवीच्या रस्त्यावरील थोरले वाड्यांत विवाह व्हावा. माझ्या आंगावर किमानपक्ष पन्नास शेर सोनें तरी घातलें पाहिजे. ज्ञातीभोजन एक सहस्त्र किंबहुना पांचशें पात्र तरी झालें पाहिजे. आपल्या वाड्यांत थोरला मंडप, ग्यासाची आराष, पुण्यांतील पदमजी शेटजींची प्रख्यात मुसलमानीण बाई जी पाल-वावर झालेल्या परभू भोजनाच्या दिवशीं आपणास हात दाखवीत होती, व आपणही तिच्या सान्निध बसलां होतां तिचें नृत्यगायन असावें.

२ वरातीच्या प्रसंगीं रुप्याचा साज घातलेला एक छानदार घोडा आपणां उभयतांस बसावयास असावा. आपणास थोरला ज्यामा घालावा लागेल. कपाळीं बाशिंग व मुंडावळ्या बांधाव्या लागतील व वरातीबरोबर उत्तम वाद्यें, हिलाल शेंपन्नास गाड्या व घोडे आणि दारूकाम याची रगड असावी. जसें कोणी म्हणेल कीं, जगत-शेटीचे नातवाचीच ही वरात निघाली आहे.

३ लग्न समारंभास व भोजन समारंभास आपल्या ज्ञातीपैकीं कनिष्ट प्रत हे पुढील गृहस्थ तरी असले पाहिजेत.

## नांवनिशी

नवे वाडीवाले विनायकराव वासुदेवजी, बंधूवर्गासह वर्तमान. रामवाडीवाले वासुदेवजी पांडुरंगजी बंधूवर्गासमान. फिरंग्याच्या देवळाजवळचे भास्कर सुंदरजी पुत्रांसह वर्तमान. पालवावरील भाऊ रसूलचे चिरंजीव बंधू वर्गासहवर्तमान. लैनींतले पांडुरंगजी दिनानाथजी बंधूवर्ग व चिरंजीव यांसहवर्तमान. काळकादेवीवाले नाना मोरोजी. वकील लोकांपैकीं विनायकराव हरिश्चंद्रजी, हरीशंकर बाळकृष्णजी, पांडुरंग बळीभद्रजी, इ० त्रान्सलेटरांपैकीं सरोत्तमजीचे चिरंजीव, बाळ दिनाजी, सोकर बापूजी, अनंदराव चापाजी वगैरे, ग्रंथकर्त्यांपैकीं शामराव मोरोजी, नारायण केशवजी, कृष्णराव माधवरावजी वगैरे. पत्रकर्त्यांपैकीं सुंदरराव 'रावजी, बाळकृष्ण वासुदेव नारायणजी, नारायण मोरोजी वागळे, इ० हेडकारकुनांपैकीं, म्युनिसिपाल खात्यांतले भास्करजी विश्वनाथजी, हारबर डॉफे. स खात्यांतले नारायण रावजी, कमिसरी खात्यांतले हरिश्चंद्रजी हरि. शंकरजी, टपाल खात्यांतले गणपतरावजी राघोबाजी उगले, मास्तराचे खात्यांतले हरिश्चंद्रजी जनार्दनजी, एग्झिक्युटिव इंजनियर खात्यांतले दिनानाथजी हरिश्चंद्रजी, कलेक्टर खात्यांतले जगन्नाथजी मोरोजी, इ० व इतर धंदे चालविणारे म्हणजे स्टांप कागद विकणारे नारायणजी सुंदरजी, नवी वाडीवाले गांवठी वैद्य सदानंदजी मोरोजी, डाक्तर शामरावजी नारायणजी, इंजनेर अनंदरावजी विनायक धैर्यवान, तसबीरवाले जी. एस्. तालपदे, विलायतेहून आलेले असिस्टंट







अनुक्रमणिका

सर्जनजी इ० याखेरीज, सर्व वाजकर कोठारे ब्रह्माडकर, नवळकर, इ. इ. इ. सह-कुटुंब, पुत्र, कन्या, भाऊबंध, सोईरे, भाचे, पुतणे इत्यादिसहवर्तमान.

## परकीय.

रा. रा. विष्णुशास्त्री पंडित, पुनर्विवाह मंडळीचे सर्व सभासद, इंदुप्रकाशकर्ते, वर्तमानदीपिकाकर्ते, ज्ञानबोधककर्ते, मित्रोदयकर्ते, पुण्यांतील ज्ञानप्रकाश, व ज्ञानचक्षुकर्ते, ठाण्यांतील अरुणोदयकर्ते, सातारा येथील शुभसूचक व महाराष्ट्रमित्र-कर्ते, अहमदनगर येथील वृत्तवैभवकर्ते, रत्नागिरींतील जगन्मित्रकर्ते, इ. इ. इ. तसेच आपल्या ओळखींचे साहेब, पारशी, मुसलमान, वाणी, भाटे, सोनार, शिंपी, शेणवी, कायस्थ, भंडारी, भट भिक्षूक वगैरे मंडळी.

४ आजपर्यंत मी खंडूस बलावीत होतें महिन्यांतून चार वेळां; परंतु आपण हा माझा अर्ज मान्य केल्यावर त्याचें तोंड पहाणार नाहीं. तरी पण वरातीचे रात्रीपर्यंत, अर्ज मान्य झाल्या दिवसापासून अर्ध बोटापेक्षां डोईवर केस जास्त वाढायाचे कठीं-णच. तेव्हां आपणांस तितक्याच वाढलेल्या केसांनिशीं मांडीवर धरून घोड्यावर बसावें लागेल. तर याविषयीं आपणांकडून नकार नसावा.

५ वयानें तरुण, रूपानें सुंदर, शरीरानें नाजुक, वर्णानें गोरी, खाण्यांत राक्षसी, निजण्यांत कुंभकर्णी, बसण्यांत जगदंबा, चालण्यांत हत्ती, बोलण्यांत वक्ती, मसलतींत चतुर, इष्की करण्यांत फक्कड अशी आहे. तेव्हां आपली उभयतांची हळद निघाल्यावर आपल्या काळका देवीवरील वाड्यांत ज्या दोन गच्चा आहेत त्यांपैकीं एकीवर आपणांस खुरसी घालून न्यूजपेपर हातीं घेऊन बसावें लागेल व दुसरे गच्ची-वर एक मोठा आरसा ठेवून त्या आरशासमोर मला बसूं द्यावें लागेल व तेथें बसून आपण आपल्या इतिहासांत सुवर्णमय अक्षरांनीं लिहून ठेवण्याजोगत्या पुनर्विवाहा बाब-दच्या जितक्या टीका व वर्तमानें त्या न्यूजपेपरांत येत जातील तितकी मला वाचून दाखविली पाहिजेत व मी माझ्यापुढें ठेवलेल्या आरशांत माझे केस प्रती मिनिटास किती वाढत असतात हें पहात बसेन तसें मला आपण बसूं दिलें पाहिजे.

६ आपण मजसाठीं फंड भरून पेनशनाची तजवीज करावयाचे खटपटींत पडूं नये. कारण मला त्याची जरूरी नाहीं. आपल्यापाठीं एक छोटेखान बहादूर मी पाहून ठेवलाच आहे.

तस्मात् अहो, माझे नवीन जन्म देणारे रावबहादूर पतीराज, हीं वरील सहा कलमें आपणांस कबूल असतील तर आपल्या गबाळ्यावरील लाख रुपयांचे वाडींत आपली भेट घेण्यास मी तयार आहें. आपणांस कळावें हे विनंती.

मित्ती अधिकमास

आपली आशाधारक,

**सुंदराबाई.**








अनुक्रमणिका

# विनायकाची एक अप्रसिद्ध कविता

वाटे ज्या बाळगणें प्राकृतभाषाभिमान हें पाप,
होवो न उंबरा ह्या चढण्याचा त्याजला कधीं ताप.

**घिनायक**

(म. सा. पत्रिका, पुणे.)

विनायक कवींची एक हस्तलिखीत नवी कविता:

कवि.

पद.

चाल- " साधु नरे मुनिकन्या"

कल्पकतेचा स्वामी - वाग्देवीचा लाल नृपा, मी
अद्वैताची पूर्ण ज्ञानी
चैतन्य जडा. मिळलें आणी
प्रवेशतों विश्वाच्या - इच्छामात्रें अंतर्यामी . १
सहज करीं जी धारितों माती
देतों तिजला सुवर्णकांती
माझ्या कौशल्यानें - वसुंधरा ही नटली नामी . २
मीच नृपांचा नृपपददाता
चिरंतनाचा मीच विधाता
वाल्मीकीची संस्थापी । अजरामरता [illegible] . ३

[illegible] [illegible]

[धुळें येथील श्री. श्री. भा. भट बी. ए. यांचे संग्रहांतील]

विद्यार्थीदशेंत मथळयाखाली दिलेली आर्या विनायकानें आपल्या अभ्यासाचे खोलींत लिहिली होती. इतकें उत्कट प्रेम मायभाषेवर त्याने लहानपणापासून केलें आणि त्याच्या स्वदेशप्रीतीमुळे त्याला स्वतःचें हयातींत लोकप्रियता इतकी मिळाली कीं, खानदेशांतील जुन्या पिढींतील कित्येक लोक त्याच्या कविता अजून प्रेमानें म्हणतांना आढळतात. सर्व महाराष्ट्र त्याच्या कविताकौस्तुभाच्या प्रभेने कोंडून जाण्याचें कारण त्याची अत्यंत भावनाप्रधान आणि जोरदार अशी अंतःकरण पिळवटून बाहेर पडणारी अत्यंत साधी, सोपी, परंतु पूर्णपणें अर्थ प्रगट करणारी सुंदर वाणी. आज प्रसिद्ध होणारी कविता विनायकाच्या सर्वोत्कृष्ट कवितांत स्थान मिळवून शुक्राच्या चांदणी-








अनुक्रमणिका

प्रमाणे उदयोन्मुख कवींस मार्गदर्शक होईल किंवा मराठी वाङ्मयचिकित्साकारांस मराठी काव्यांत एक अपूर्व भर आहे असें वाटेलसें वाटतें. किंबहुना ही कविता त्याच्या काव्याचा आत्मा आहे.

ही कविता ति. श्री. रा. रा. भा. बा. भट, वकील, धुळें यांच्या स्मरणवहींत स्वतः विनायकाने २७।२।१९०२ रोजीं आपल्या हातानें लिहिली. १८९९ साला-पासून आमचे वडिलांचा व विनायकाचा परिचय श्री. रा. रा. शं. श्री. देव यांचेमुळें झाला होता. आणि त्याचें फळ ही कविता. विनायकाला आपल्या मित्रमंडळींत गप्पा करीत असतां आपल्या कविता म्हणून दाखविण्याचा नाद असे. विनोदी स्वभावा-बद्दल त्याची ख्याती होती व त्यामुळेच त्याने आपल्या मित्रमंडळींचें प्रेम संपादन केलें होतें. ही कविता अशाच एका मित्रसंमेलनप्रसंगीं बसल्याबसल्या लिहून ठेव-लेली आहे. अशा पुष्कळ अप्रसिद्ध कविता त्याच्या मित्रांजवळ सांपडण्याचा संभव आहे.

ह्या कवितेंत कवि आणि काव्यविषयक कल्पना आहेत. तेव्हा दोन बाजूंनी या कवितेकडे पाहावें लागेल. प्रथमतः कवि कल्पकतेचा स्वामी आणि अज्ञेयाचा ज्ञाता आहे. तो वाग्देवीचा लाल आहे. त्याच्यांत जडांना स्वबलानें चैतन्य देण्याची, इच्छा-मात्रें विश्वाच्या अंतर्यामांत शिरण्याची, वसुंधरा स्वकौशल्यानें नटविण्याची आणि त्यामुळें श्रीरामाला अजरामरता प्राप्त करून देण्याची शक्ती आहे. आणि या शक्तींचा उप-योग जडांना चैतन्य, मातीस सुवर्णकांती, नृपांना नृपपद, चिरंतन उत्पत्ति आणि अजरामरतोत्पत्तींत तो करतो. यावरून कविविषयीं खालील अनुमाने निघतात. प्रतिभासंपन्न कवि अभिजात ( born poet ) असतो. अज्ञेयज्ञानामुळें हळुवार आणि भावनाप्रधान मताचा, कल्पकतेमुळें चिरंतनाचा विधाता आणि भाषाप्रभुत्वामुळें एका ललितकलेचा तो स्वामी असतो. आणि ही काव्यकला अजरामर अशी क्षणाक्षणाला नवीन सौंदर्य प्रतीत करणारी वस्तु निर्माण करून त्यास व इतरांस आनंद देते.

विनायकाच्या 'प्रीती निमाली तर, स्त्रीपुरुष, चिमा, सुवास' ह्या कविता सर्वोत्तम ठरल्या आहेत. कारण त्यांतील भावना व कल्पना उत्तम आहेत. त्यांची मांडणी आटोपशीर आणि भाषा प्रवाही असून अर्थगांभीर्य साधलें आहे. शिवाय व्यक्तांतून निघणारा अव्यक्ताचा ध्वनी, लोकप्रिय चाल, अर्थ व्यक्त करण्याची पद्धत आणि त्याहून अधिक पूर्णपणें अर्थ व्यक्त करणारे वाच्यार्थ व नादमूलक (Phonetic) शक्ती एकवटलेले सोपे शब्द. ही कविता वाचून पाहिल्यास हे सर्व गुण तिच्यांत आहेत हें ध्यानांत तेव्हाच येईल. शब्दयोजना ह्या कवितेंत विशेष सुंदर झाली आहे असें वाटतें. चिरंतन अंतर्याम, अजरामरता हें शब्द पैलू पाडलेल्या हिऱ्याप्रमाणें निरनिराळ्या बाजूंनी अर्थ सुचवीत आहेत. तात्पर्य ही कविता विनायकाच्या उत्कृष्ट कवितांत मोडेल.

३१३






अनुक्रमणिका

विनायकाच्या कवि आणि काव्यविषयक आणखी दोन कविता आहेत. नदी आणि कवि व कवि आणि पोपट. मात्र या कवितांतून त्याच्या कवि आणि काव्य विषयक कल्पना परिपक्व झालेल्या दिसत नाहीत. ह्या कवितेंत कल्पना परिपक्व असल्यामुळें त्या कविता हिच्या पूर्वीच्या असाव्या. शेवटीं विनायकाच्या कीर्तींत भर टाकणारी ही कविता प्रसिद्ध करण्याचें भाग्य लाभल्याबद्दल ईश्वराचे आभार मानून हा लेख पुरा करतों.

३१ जुलै १९३४. श्री. भा. भट

---

# रद्दींतील रत्नें

रत्न ७ शोधक—संपादक.

## धूमकेतु

ज्ञानोदय, १६–५–१८५३

या महिन्याची ६ वी तारीख शुक्रवार यापासून दर शुक्रवारीं धुमकेतु असें वर्तमानपत्र निघूं लागलें व त्याचा पहिला अंक आम्हास पोंचला. याची किम्मत वर्षास चार रुपये आहे व तें चांगलें आहे. आणि या देशांत उत्तरोत्तर वर्तमानपत्रें वाढूं लागलीं हा सुधारणुकीचा एक रस्ता आहे. धूमकेतूचे प्रस्तावनेंतून कांहींसें येणेप्रमाणें उतरून घेतों.

हिंदुस्थानच्या या भागांत दर्पण हें मराठी वर्तमानपत्र पहिल्यानें निघालें तेव्हांपासून आजपर्यंत सहा वर्तमानपत्रें निघालीं व हल्लीं सुमारें महिन्यावर एक नवीन पत्र निघालें आहे तें धरून आतां आमचें हें जें आजपासून धूमकेतु पत्र निघालें ही आठवी पिढी आहे. यांपैकीं कित्येक पत्रें कांहीं कारणामुळें बुडालीं व कांहीं अजून चालत आहेत. दर्पणानंतर पुढें अखबार, त्याच्यापुढें प्रभाकर, तदनंतर ज्ञानोदय, तदनंतर पुण्यांतील ज्ञानप्रकाश, त्यापुढें शुक्रोदय, त्याच्यापुढें वर्तमामदीपिका व आतां शेवटीं हें धूमकेतु पत्र निघालें आहे.




अनुक्रमणिका

# पश्तो भाषा मराठी भाषांतर

सौ. विनोदिनी सु. गायकवाड मु. कोल्हापूर
यांच्या लेखांतील मुद्यांचा सारांश.

१ तकुम कलीदा = तुम्ही कोणत्या कुळाचे अहां.

२ बारॉण रागले — पाऊस आला.

३ रुबा बराशा = तो सकाळीं येईल.

४ ओ जनकाई ! दिलता राशा केनाः = हे मुली, लौकर ये; बस ('सकाळ' साहित्य अंक ता. २४-१२-३३ श्री. विमुक्त)

यावर टिपणः

कलीदा याचा संबंध कुलूद म्हणजे कुळाचा या दप्रत्ययान्त कानडी रूपाशीं असावा.

रागले याचा संबंध रा म्हणजे ये या तेलगू शद्बाशीं असावा.

बराशा याचा संबंध कानडी बा (बरु) म्हणजे ये याच्याशीं असावा.

केनाः याचा संबंध कूड्रोण या कन्नड क्रियापदाशीं असेल.

पश्तो, ब्राहुद व कानडी, तेलगू आदि द्राविडी भाषा यांचा बराच संबंध असावा. "आन्ध्र, कन्नड, तामिळ, मल्याळी इत्यादि द्राविड भाषांच्या परिषदांची व आन्ध्र, मद्रास, म्हैसूर, मुंबई, उस्मानिया अन्नेमलाइ, पंजाब व अफगाण या विश्व-विद्यालयांची सहानुभूति नामदार शिक्षणमंत्री कंबळी यांच्यासारख्या शिक्षण-मंत्र्यानीं मिळवून वरील भाषांचे परस्पर संबंध विद्वानांकडून ठरवून घेण्याचे कामीं पुढाकार घ्यावा."

---

# रद्दींतील रत्नें

रत्न ८ — शोधक—संपादक.

ज्ञानोदय, २–५–५३

..........त्या दिवशीं (१६ एप्रिल १८५३) तीन वाफेच्या गाड्या व लोकांस बसावयांचे २० मोठे रथ जोडून त्यांतून चारशें लोक संध्याकाळीं चार वाजतां ठाण्यास निघाले. तेव्हां तो चमत्कारिक समारंभ पाहायास दुतर्फे हजारो लोक कोश दीड कोशपर्यंत व पुढें गावोगावींहि उभे राहिले होते, आणि बिन् घोड्याचे बिन बैलांचे हे रथ असून वेग तर त्यांच्याहि पेक्षां फारच असें पाहून त्यांस अति आश्चर्य वाटून टाळयाच पिटूं लागले; आणि कित्येक ज्ञात्यानी तर पुराणांतरीं मनोवेगगामी रथ-वर्णन जें केलें तें हेंच काय? अशा कल्पना केल्या. आणि सर्वांच्या तर असें मनांत आलें कीं असलीं अमानुष कृत्यें जे हे युरोपियन करणारे यांच्यापुढें कोण उभा राहणार आहे? आणि शास्त्र पुराणादिकांत जें सांगितलें आहे कीं सत्ययुगांतल्या शक्तीचा कलि-युगांत ऱ्हास होऊन कलियुग तुछ होईल तें सर्व मिथ्या आहे..........







अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

## व्याकरण समिति

# प्रश्नावलि

[ नागपूर येथे भरलेल्या साहित्यसंमेलनामध्ये या समितीचें कार्य करण्यास एक वर्ष अधिक मुदत देण्यांत आली. यामुळे व अधिक विद्वान मंडळीस या प्रश्नांस उत्तरें देण्यास सवड मिळावी म्हणून ही प्रश्नावली पुन्हा प्रसिद्ध करण्यांत येत आहे. ]

ता. ७ व ८ मे १९३३ च्या सभेंत पहिल्या पत्रकावरून आलेल्या सूचनांचा विचार करून सर्वानुमतें पुढील प्रश्नावलि तयार करण्यांत आली.

**१ सामान्य**—व्याकरणरचनेस कोणती पद्धति स्वीकारावी म्हणजे संस्कृत व प्राकृत व्याकरणांस अनुसरून किंवा इंग्रजी व्याकरणास अनुसरून किंवा गुजराथी –हिंदी यांस अनुसरून ?

**२ वर्णविचार**—[ अ ] स्वरांची संख्या व क्रम कोणता असावा ? [ आ ] व्यंजनांची संख्या व क्रम कोणता असावा ?

–[ अ ] ऋ व लृ यांचा स्वरांत अंतर्भाव करणें आवश्यक आहे काय ? तसेंच अं, अः हे स्वतंत्र स्वर मानणें आवश्यक आहे काय ? तसें मानल्यास आं, इं, ईं, उं इत्यादि स्वतंत्र मानावे लागणार नाहींत काय ?

[ आ ] य, र, ल, व ह्या अंतस्थांचा रूढ क्रम बदलून य, व, र, ल करावा काय ? कारण संधि करतांना इ, उ, ऋ, लृ यांना अनु० य्, र्, ल् असे आदेश होतात. उलट य, व, र, ल यांचें संप्रसारण इ, उ, ऋ, लृ असें होतें.

**३ शब्दविचार**—[ अ ] नामांचे प्रकार कोणते मानावे व त्यांची आवश्यकता आहे काय ?

[ आ ] सर्वनाम म्हणजे काय ? सर्वनामें कोणतीं ? सर्वनामांचे प्रकार कोणते?

–हा मुलगा, तो मुलगा या ठिकाणीं 'हा' 'तो' हीं सर्वनामें कीं विशेषणें ? सर्वनामांचे मुख्य प्रकार प्रथम पुरुषवाचक, द्वितीय पुरुषवाचक व तृतीय पुरुषवाचक असे करून मग तृतीय पुरुषवाचक सर्वनामांचे दर्शक, संबंधी........असे मानावे ? तसेंच पुरुषवाचक, दर्शक........असे प्रकार मानल्यास 'तो' सर्वनाम कोणकोणत्या प्रकारांत मानावयाचें ?








अनुक्रमणिका

[ इ ] विशेषण म्हणजे काय ? विशेषणांचे प्रकार कोणत्या तत्त्वानें करावे व कोणते करावे ?

—विशेषणांचे प्रकार—४ गुणविशेषणें, संख्याविशेषणें, विधिविशेषणें व क्रिया-विशेषणें हे कोणत्या तत्त्वानुसार केलेले आहेत ?

[ ई ] संयुक्त क्रियापद म्हणजे काय ? तें मानण्याची आवश्यकता आहे काय ? त्याचप्रमाणें संयुक्तकाळ मानावयाचे झाल्यास त्यांचे अपूर्ण, पूर्ण, रीति, उद्देश वगैरे कोणकोणते पोट प्रकार ठरवावे ?

**टीप**—संयुक्त कियापदें मानलीं पाहिजेत, परंतु संयुक्तकाळ मानण्याची आवश्य-कता नाही असें, किंवा संयुक्त क्रियापदें मानूं नयेत पण संयुक्तकाळ मानावे असें, आपलें म्हणणें असल्यास तेंहि सकारण नमूद करावें.

**४ विभक्ति विचार**—[ अ ] विभक्ति म्हणजे काय ? विभक्ति प्रत्ययांवरून मानाव्या कीं अर्थावरून मानाव्या ?

—द्वितीया व चतुर्थी या दोन विभक्तींचे प्रत्यय एकच असल्यामुळें त्या दोन निराळ्या मानण्याची आवश्यकता आहे काय? किंवा द्वितीयेचा अंतर्भाव चतुर्थीत करावा? द्वितीया निराळी मानण्याची आवश्यकता असल्यास ‘अप्रत्यय द्वितीया’ मानण्याची आवश्यकता काय ? षष्ठी ही विभक्ति आहे कीं विशेषण आहे ?

[ आ ] आख्यातांची व्यवस्था कै० दामले किंवा श्री० ना. वि. आपटे यांनी सुचविल्याप्रमाणे ( म्हणजे प्रत्ययांवरून विभक्ति मानून प्रत्येक विभक्तीचे कारकार्थ सांगावयाचे, त्याचप्रमाणें प्रत्ययांवरून आख्यात मानून प्रत्येक आख्याताचे काळ वा अर्थ सांगावयाचे ? ) करावी किंवा कसें ?

**५ वाक्यविचार**—[ अ ] प्रयोग म्हणजे काय ? प्रयोगाचे प्रकार किती व कोणते ? कर्ता व कर्म म्हणजे काय ?

त्यानें कथा श्रवण केली, मी स्नान केलें, वैद्यानें रोग्याला बरा केला, त्याचें लिहून झालें, मला गांवीं जाणें आहे, मला स्वप्न पडलें..................इत्यादि वादग्रस्त वाक्यांचा प्रयोगनिर्णय कसा करावा ?

[ आ ] मराठी भाषा ही विभक्तिप्रचुर असल्यामुळे वाक्याचा अर्थबोध होण्यास अडचण पडत नाही. अशा स्थितींत वाक्य-पृथक्करणाची आवश्यकता आहे काय? अस-ल्यास तें कोणत्या पद्धतीनें करावें ? ( म्हणजे वाक्यपृथक्करणाचा खुलाशासह नमुना )

६ ग्रंथावरून व्याकरण करण्याची ठरीव पद्धति कशी असावी ? ( व्याकरण चालवितांना कोणकोणत्या गोष्टींचा उल्लेख करावा ? )








अनुक्रमणिका

७ यांखेरीज आणखी कांही वादग्रस्त प्रश्न कोणास सुचविणें असल्यास सुचविणेंची कृपा करावी.

सदर प्रश्नावलीचीं उत्तरें अभ्यासकांनी तारीख १५ सप्टेंबर १९३४ पर्यंत पाठवावीं अशी विनंती आहे.

पत्रव्यवहार श्री. य. रा. दाते, कार्यवाह व्याकरण समिति, महाराष्ट्र कोश-मंडळ, लि० ४९५ शनिवार पेठ, पुणें, या पत्त्यावर करावा.

ना. गो. चापेकर,
अध्यक्ष.

---

# चंद्रपुरी शब्द

## नामें

अघाड = मोठी, ऊंच.
आदडा = आदळ, गर्दी.
इरा = विळा.
कटरी = लहान, दिघडी.
कोंडली = लहान मडकें.
चुव्वा = विहिरा.
ठाठ = चक्क, पूर्णप्रकाशित.
डारंबी = माजघरांतील दार.
ढगल्या = घरजांवई
तानीमासी = तान्हें मूल.
दंडोक = लग्नसमारंभांतील कुत्यें.
दुपाडगी = दोन बाजूचे.
दंड = शेत अथवा शेतांतील भाग
पेऊली = बासांची लहान पेटी
बोहरणी = केरसुणी.
बेस = चांगलें.
बेंडवा = कोंबडी बदकें ठेवण्याचे बांसाचे कपाट.
बेर = Bracelets
भाना = ताट.
भदाड = भांडे.
भंजाडी = सरकारी जंगल.
मग्यान = घरामागील छोटीशी वाडी
मांडोस = फागशु॥ पौर्णिमा.
येळ = कडे.
येळणी = पराती वाटी.
वडग = टोपली.
हुडकी = डोंगराखालील नाला.
हेंल = पाण्याचें मोठें मडकें

## क्रियापदें

दापुन ठेवणें = झांकून ठेवणें.
बारपणें = विझवणें.
पवणें = दिसणें.
ठाव नसणें = माहित नसणें.

वि. वा. जोशी—मूल

---








अनुक्रमणिका

# पारिभाषिक शब्दकोश.

महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषामंडळाने साहित्यपत्रिकेंत प्रसिद्धीकरता दिलेलें हें आठवें पत्रक आहे. प्रकाश, वीज, रसायन सामान्य विभाग, रसायन अनार्वण विभाग, उष्णता, भौमिक आणि भूमिती इतके विषय पूर्वीच्या पत्रकांत येऊन गेले आहेत. याखेरीज वैद्यक शाखेपैकीं सौतिक, ऐंद्रिय व शारीर या विषयासंबंधी शब्दकोश वैद्यकसंमेलन पत्रिकेंत प्रसिद्ध केले आहेत. प्रस्तुत पत्रकांत सांवाहिक आणि तदनुषंगिक ध्वनशास्त्र या संबंधीं शब्दकोश दिला आहे. रीतीप्रमाणे याही कोशाची चर्चा उप-मंडळाच्या सभांमधून झालेली आहे. विद्वान् वाचकांनी याजवर साधकबाधक टीका केल्यास तिचाही योग्य तो उपयोग मंडळाकडून केला जाईल.

२८१ सदाशिव, पुणें
१६।७।३४

कार्यवाह
म. शा. परिभाषा मंडळ

## संवाह प्रकरण

Aether = संवह
Aether vibrations = संवह-तरङ्ग
Adjustable, Variable = विधेय
Alternating Current = यातायातिक वहा- ( वहाळ )
Alternation = अयन
Amateur = व्यासङ्गी
Ampere turns = वहाळ वेढे
Amplification = विवर्धन
Antenna or Aerial = आकाशीय
Anode = धनप्रस्थ
Battery = विजेरी
Bias = अवपातन, अवपात
Broadcasting = परिक्षेपण
Broadcasting Station = ( सांवाहिक ) प्रेषास्थान
Broadcasting Studio = ( सांवाहिक ) कलास्थान
Bypass = पळवाट, शाखान्तर
Capacity, Capacitance = धारण
Capacity Reactance = प्रत्यवरोध
Cathode = ऋणप्रस्थ
Cell ( of a battery ) = संपुट
Characteristic = वर्तनरीति
Characteristic Curve = वर्तनी
Charge = उच्चय
    Pos-charge = धनोच्चय
    Neg-charge = ऋणोच्चय
Charged = उच्चयी
    Positively charged = धनोच्चयी
    Negatively charged = ऋणोच्चयी
Charging = भरणूक
    Discharging = (१) खपणूक, खपव-णूक (विजेरीसंबंधीं) (२) विसर्जन
Choke coil = चेंचकर्डे
Choke = परिघ
Circuit = सरणि
Circuit, Magnetic = वैकर्षिक सरणी
Circuit Electric = वैजिक सरणि
Circuit, Oscillatory = दोलनी
Circuit, open oscillatory = आन्दोलनी
Coherer = सक्तक
Coil = कर्डे
Communication = समनुयोग
Compass = दिशादर्श





Condenser, Capacitor = धारणी
Conductivity = वाहिकता
Coupling ( of Circuits ) = अभियोग
Crystal = रवक
Current = वहा, वहाळ
Cycle = पर्येय
Damped waves = दान्त तरङ्ग
Detection, Demodulation = उपार्जन
Diode valve = द्विप्रस्थ ( द्वारक )
Direct Current = सरळ वहाळ
Displacement = प्रसर
Distortion = विकरण
Earth, Ground = भूगत, भूमिगत
Electrode = प्रस्थ
Electron = वीजक, ऋणवीजक
Electron Current = वीजकधारा, धारा
E. M. F. = ऊर्जे
• Counter E. M. F. = प्रत्यूर्जे
Filament = तन्तु
Grid = जालक
Plate = पत्रक
Filters = गाळण्या, चाळण्या
Fixed = अविधेय
Fluctuation = विचलन
Flux = ( कर्ष-रेषांचा ) स्रोत
Frequency = क्षिप्रता
Low or Audiofrequency = श्राव्य-क्षिप्रता, लघुक्षिप्रता
Radio or High } frequency = महाक्षिप्रता
Frequency, fundamental = कनिष्ठक्षिप्रता
Natural = निज क्षिप्रता
Harmonic = प्रगुण क्षिप्रता
Inharmonic = अप्रगुण क्षिप्रता
Fuse = तारणी; ( तारणतार )
Grid = जालक
Filament = तन्तु
Plate = पत्रक
Grid leak = जालक-स्रवणी, स्रवणी
Head Phones = कर्णिका
Hydrometer = तरकांटा
Hysteresis = अवग्रह
Impedance = संरोधन
Inductance = निर्बन्धन
Induction (i) electrostatic = विभावन
(ii) electromagnetic = उर्जोद्भावन, उद्भावन
(iii) magnetic = विकेतन, अनुभावन
Inductive = उद्भावक
Inductor (Inductance) = बन्धनी, निर्बन्धनी
Input = आदान
Insulation = निरोधन
Ionization = विदलन
Ions = दलें
Loud speaker = महावक्त्र
Microphone = श्रोत्र, श्रवणिका
Modulation = प्राकरण
Nodes = विष्टम्भ, गांठी
Loops = विक्षोभ, पोटऱ्या
Noninductive = अनुद्भावक
Output = प्रदान
Parallel Circuit = शाखान्तर सरणि, शाखान्तर
Period (of Oscillation) = पर्ययकाल
Permeability = गमनीयता
Pentode = पञ्चप्रस्थ
Phase = अय
Phase angle = अयांश
Potential = क्षिति
Potential Difference = क्षितिभेद
Potential Divider = ऊर्जभेदनी
Professional = व्यवसायी
Pulsating Current = उत्सेधी वहाळ
Pulsation = उत्सेध
Radiation = प्रारण
Radio (Wireless) = बिनतारी; सांवाहिक








अनुक्रमणिका

Radio-Brodcasting = सांवाहिक परिक्षेपण
Radio-Reception = सांवाहिक ग्रहण
Reactance = अवरोधन
Rectifying = अर्जन
Regeneration, Retroaction, Reaction = प्रत्यादान
Relay = उद्युक्तक; युक्तक
Resistance = रोधन
Resistivity = रोधिकता
Resistor = रोधनी
Selection = विवेचन
Self induction = स्वोद्भावन
    Mutual Induction = परोद्भावन
Shielding = प्रावारण
Short Circuit = छोटी वाट
Shunt = शाखान्तर, शाखोळ
Signals = संज्ञा
Tetrode = चतुष्प्रस्थ
Transformer = रोहित्र
Transformer, Step-up = आरोहित्र
Transformer, Step-down = अवरोहित्र
Transformer Primary = दिति
    Secondary = अदिति
Transmitting Station = प्रेषास्थान
Transparency = निर्गम्यता
Triode Valve = त्रिप्रस्थ ( द्वारक )
Tuning in = सुयोजन, निनादन
Vacuum = व्यनिल, रिक्त
Vacuum, Degree of = रिक्तता, रिक्ताई
Voltage, Tension, Pressure = ऊर्ज, प्रेरण
Valve, Vacuum Tube = द्वारक
Wave = तरङ्ग
Sine Wave = स्यनियमानुसारी अ० स्यनियम तरङ्ग
Wave-length = तरङ्गायाम, आयाम

## ध्वनशास्त्र प्रकरण

Adiabatic Elasticity = असंक्रम स्वाग्रह
Isothemalelasticity = ससंक्रम, स्वाग्रह
Amplitude = त्रिज्या
Audition = श्रवण
Audibility = श्राव्यता
    Limits of audibility = श्राव्यकोटी
Beats = कलह
Composition = समसन
Concord, Consonance = सात्मता
Discord, Dissonance = असात्मता
Elasticity = स्वाग्रह
    Inertia = निरूढि, जडता
Free Vibration = स्वानुनाद
Forced Vibration = बलानुनाद
Frequency = क्षिप्रता
Harmonics = प्रगुण, ( उपस्वन )
Inharmonic = अप्रगुण, ( उपस्वन )
Interference = संहनन, संग्रहण, निग्रहण
Intensity = महत्ता, लहानमोठेपणा
Loudness = तीव्रता; लहानमोठेपणा
Major Chord = मुख्य त्रितय अ० त्रिगण
Minor chord = गौण त्रितय अ० त्रिगण
Major Tone = स्वनिका
Minor Tone = उपस्वनिका
    Semitone = अर्धस्वनिका
Medium वहित्र
Material Medium = वास्तव वहित्र
Musical Instrument = वाद्य
Musical Interval = सुरान्तर
    Frequency Ratio = क्षिप्रता गुणोत्तर
    Difference of Pitch = क्षितिभेद
Musical Scales = सांगीतिक श्रेणी
Noise = ध्वान, गोंगाट, कोलाहल
Note or Tone = सूर; ( सुर )
Overtone = उपस्वन






अनुक्रमणिका

Pitch = क्षिति, कनिष्ठ क्षिप्रता ( सुराची ); प्रस्वन; उंचनिंचपणा
Production of Sound = ध्वनोत्पादन
Propagation of Sound = ध्वनसंचरण
Pure Tone = स्वन
Quality = स्वता, स्वत्व
Timbre = ( सवन ), सामग्री
Reed instrument = सजिह्व वाद्य, जिव्हाळ्याचें वाद्य
Reflection = परावर्तन
Refraction = परिवर्तन
Resonator = निनादी
Simple Chord = द्वितय
Octave अष्टम; द्विगुण सूर
Seale सुरावळी, सुरावट
Siren = ( भोंगा ) सूरमापक
Solids, Liquids Gases स्थाणु, द्रव, वायु
Solid, Liquid, Gaseous states = स्थाणवीय, द्रव, वायवीय अवस्था
Sound = { आवाज / ध्वनि } ( कर्णगृहीत ), ध्वन ( वास्तवरूप )
Sounding Body = ध्वनत्पदार्थ
Stringed instrument = तन्तु वाद्य
Supersonic Waves = श्राव्यातीत तरङ्ग
Tuning Fork = सूर कांटा
Velocity of Sound = ध्वनवेग
Vibrations = कम्पनें, प्रकम्प
Wave theory = तरङ्गकल्पना
Waves, Transverse = अन्वतरङ्ग
Waves, Longitudinal = अनुतरङ्ग
Wind = वात
Wind Instrument = सुषिर
Wood wind Instrument = वेणुसुषिर
Brass wind instrument = धातुसुषिर

## यामिक प्रकरण

Acceleration = १ प्रजवन २ प्रवेग
Accuracy = परिच्छिन्नपणा, कांटेकोरपणा, मानशुद्धपणा
Amplitude = परमप्रसर, त्रिज्या
Angular velocity = परिवेग
Antiresultant = प्रत्यादेशक, प्रतिसमासक
Arm of a Force = (प्रेरकाचा) हस्तक
Balance = तोलकांटा
Spring Balance = ताणकांटा, दाबकांटा
Balanced = तुलित
Barometer = भारमापक
Buoyancy = समुत्साह
Capacity of a Vessel = पात्राचा मात्र
Centre of forces = प्रेरककेंद्र
Centre of Gravity = गुरुत्वकेन्द्र
Centre of mass = वस्तुकेंद्र
Centrifugalforce = उन्मध्य प्रेरक
C. G. S. system = वि. या. ग्रा. पद्धति ( अनुक्रमें विपल-यात्र-ग्राम )
Circular motion = वृत्तगति
Clockwise = सव्य
Anticlockwise = अपसव्य
Compass = कर्कटक
Component = पद
Composition = समसन
Decomposition = विग्रहण
Conditions of Equilibrium = संस्थितिसमय
Conversion = विभावन
Transformation
Cycle = पर्यय
Deceleration = विजवन
Density or Mass per unit volume = घनता, भारवत्ता
Relative Density or Sp. Gr. = घनताङ्क, सापेक्षा घनता








अनुक्रमणिका

Diffusion = व्यतिकर
Dimensions = परिमाणें
Direction = दिक्, दिशा
Displacement (Hydrostatics मधील) = समुत्सार
Displacement ( e. g. S. H. M. ) of a Body = पदार्थाचा प्रसर
Displacement ( of a force ) = प्रेरकाचें चलित
Dynamics = प्रेरकीय
Efficiency = तत्परता
Effort = यत्न
Elasticity = स्वाग्रह
Energy = १ तेज ( subtle सूक्ष्म ) २ शक्ति ( mechanical = स्थूल )
Equilibrant = प्रत्यादेशक प्रतिसमासक
Equilibrium = संस्थिति
Equilibrium, neutral = तत्सम संस्थिति
,, stable = स्थावर ,,
,, unstable = गत्वर ,,
Force = प्रेरक
F. P. S. system = फु. पौ. से. पद्धति
Friction = घृष्टि
Frictional force = घर्षक
Gravitation ( universal ) = संकृष्टि
Gravitational force = संकर्षक
Gravity = निकृष्टि
Force of G. = निकर्षक
Hydrodynamics = द्रवद्रुत्य
Hydrostatics = द्रवस्थित्य
Impact = आघात
Impulse of a force = प्रेरकाचा आवेग, प्रवर्तन
Inclined Plane = उतरण, चढण, उत्सर ( यन्त्र ), अधिरोहिणी
Inertia = निरूढता, निरूढि, जडता, प्रेर्यत्व, वेगसाम्य
Isochronous = समावधिक

Kinematics = गतिरूपीय
Kinetic Energy = वेगीय शक्ति
Kinetics = गतियामिक, चलप्रेरकीय
Lever = दण्डयन्त्र
Leverage = दाण्डा
Load = भार
Machine = यन्त्र
Science of Machines = यन्त्रयामिक
Magnitude = मान
Mass of a body = पदार्थाचें वस्तुमान
Measuring strip = मोजपट्टी
Measuring vessels = मोजपात्रें
Mechanical advantage = सौकर्य
Mechanics = यामिक
Moment of a force = ( प्रेरकाचें ) परिबल, परिप्रेरक
Moment of Inertia = परिवस्तु
Momentum = प्रवृत्ति, प्रवृत्तत्व, प्रवृत्तिमत्त्व
Moment of Momentum = परिप्रवृत्ति
Ortho-component = अवयव
Parallelogram of Vectors ( Principle of ) चतुरस्र नियम
Period = पर्ययकाल, अवधि
Pneumatics = वायवीय, वायवीयशास्त्र
Polygon of Forces = प्रेरकीयबहुस्र
Potential Energy = वर्चसीय शक्ति
Power ( rate of doing work ) = ओज, तरस्विता
Pressure ( Intensity of ) = प्रेरण
Protractor = वलयी
Quantity = राशि
Radian Measure = अरीयमान
Radius of Gyration = पर्यरित्र, परिवलारित्र
Resultant = समासक
Revolution = परिभ्रमण
Rotation = वलन, परिवलन
Scale = अंकावलि, अंकोळ








अनुक्रमणिका

Scalers = अशर, ( अशर राशि )
Simple Harmonic Motion = सरलावृत्त गति
Simple Machines = मूलयन्त्रें
Speed = जव
Statics = स्थितियामिक, स्थिरप्रेरकीय
Structures = तन्त्र
Science of Structures = तन्त्रयामिक
Surface Tension = पृष्ठताण
Torsion Balance = पीळकांटा
Triangle of Forces = प्रेरकत्र्यस्र
Triangle of Velocities = वेगत्र्यस्र
Unit = एकधेय
Vector Triangle, law of = त्र्यस्र-नियम
Vectors = सशर ( सशर राशि )
Velocity = वेग
Velocity Ratio = व्याक्षेप
Vertical line = निकर्षरेषा
Viscosity = घस्किटपणा, घस्कटता
Volume = आकार, आकारमान
Weight = वजन, भार
Weight per unit volume = भारवत्ता
Wheel and Axle = चक्रोपचक्र
Work ( done ) = कृत, कृतसंपादन
,, virtual = कार्य

# रद्दींतील रत्नें

रत्न १ शोधक—संपादक.

## विचारलहरी.

ज्ञानोदय, १५–६–५३

या शहरांत पूर्वीं दर्पण, मुंबई अखबार, बोधसागर, दिग्दर्शन इत्यादि वर्तमानपत्रें व पुस्तकें होऊन गेलीं. त्यानीं लोकांचें कल्याण बरेंच केलें; परंतु अरुणोदय, उपदेशचन्द्रिका, प्रबोधचन्द्रोदय, यानी बहुत दुर्गुण उधळून शेवटीं हातपाय आपटून जीव सोडला; आणि आपल्या पाठीमागें बरीच घाण जमवून ठेविली होती, पण ती ज्ञानोदयरूप वाऱ्याने लवकरच उडवून नाहींसी केली. आणि जिकडेतिकडे हवा स्वच्छ होत आहे इतक्यांत पुणें येथें अकस्मात् एक नवीन दुर्गंधीची खांच उघडली. तिची तयारी बहुत दिवसांपासून होत होती.

चोर व ठक लोक यांस आपल्या नांवागांवाची प्रसिद्धी होण्याची अगदीं इच्छा नसती. उपदेशचन्द्रिका, प्रबोधचन्द्रोदय व विचारलहरी यांचे कर्ते कोण, कोठें शिकलेले व काय रोजगार करीत, हें त्यांच्या मंडळीशिवाय बाहेर कोणास चांगलें माहीत नव्हतें. याचें कारण ते स्वतः आपलें अंग ह्या कामांत आहे असें दाखवावयास लाजत असत.

आलिकडेस सुमारें एक महिन्यापासून विचारलहरी मुंबईस येत नाहीं, त्यावरून ती दुखण्यांत पडली आहे किंवा तिचा काळ झाला हें समजत नाहीं. जर ती आजारी पडली असेल तर तिची अत्यावस्थाच आहे असें समजावें. आतां विचारलहरीचा हेतु स्वदेशकल्याण करावयाचाच खरोखर होता तर तिला बहुत गोष्टी सुधरायाजोग्या होत्या; पण त्यांविषयीं तर चकार शब्दहि तिनें काढला नाहीं!








अनुक्रमणिका

# अभिप्राय



**आर्यसंस्कृतिः**—[श्रौताचार्य, धुंडिराज गणेश दीक्षित बापट, सोमयाजी यांचीं सहा प्रवचनें, संग्राहक-रा. चिं. गो. जोशी, प्रकाशक,-म. पां. नेने बडोदें, किं. ६ आणे ] प्राचीन वैदिक संस्कृतीची महती यांत दर्शविली आहे. यांत २९ पोटविषय आले आहेत. त्यांत १५ व्या विषयापर्यंत आलेली माहिती व विचार मामुलीच आहेत. पुढें मात्र कांही भाग महत्त्वाचा आहे. वैदिक स्त्रिया, अनेक कला, [१५] [१६] ललितकला [१८] या प्रकरणांतील माहिती अत्यंत उपयुक्त आहे. यज्ञद्वारा संगतीकरणाची शास्त्रीबोवांची मीमांसा मननीय वाटते. परंतु विचारवंतांना मुख्य खटकणारा प्रश्न जो वर्णांची जन्मसिद्धता त्याच्या युक्तायुक्ततेचा विचार यांत थोडाच आला आहे. वर्ण पराक्रमानें बदलतां येई याविषयीं उदाहरणें शास्त्रीबोवांनी दिलीं आहेत. तसेंच जुन्या विद्वानांनाहि सौम्यपणें कांही सूचना त्यांनी केल्या आहेत. हें पुस्तक अवश्य संग्रही ठेवण्यासारखें आहे. कालाभावी ज्यांना प्राचीन वैदिक संस्कृतीची अधिक माहिती करून घेतां येण्यासारखी नाही त्यांना याचा विशेष उपयोग होईल.

—संपादक.

**विश्वनाथ काशीनाथ राजवाडेः**—[लेखक-गं. दे. खानोलकर, प्रकाशक-ग. म. वीरकर, साहित्यसेवक छापखाना, पुणें शहर, किं. ८ आणे ] सुमारें १०० पानांच्या या पुस्तकांत "राजवाडे यांची-यांच्या विचारसरणीची व कार्याची-तोंडओळख" करून देण्याचा प्रयत्न रा. खानोलकर यांनी केला आहे. त्यांच्यामतें हें पुस्तक "राजवाड्यांचें चरित्र नसून तो एक चरित्रात्मक प्रबंध" आहे. या प्रबंधात राजवाडे तिलांजलि अंक, ग्रंथमालेंत राजवाडे यांनी लिहिलेलें आत्मचरित्र वगैरे पुस्तकांतील उतारेच रा. खानोलकर यांनी उतरून घेऊन त्यांची जुळणी केली आहे. राजवाडे यांच्याविषयीं स्वतःची अशी माहिती लेखकास विशेषशी नाही. अन्यत्रही राजवाडे यांच्याविषयीं फार माहिती प्रसिद्ध नाही. त्यांचें खरें चरित्र त्यांच्याच शाखेंतील कोणाकडून तरी लिहिलें जाणें अवश्य आहे. परंतु त्याला कांही अडचणी आहेत. राजवाड्यांचें मुख्य कार्य या पुस्तकांत रा. खानोलकर यांनी आकलन करून थोडक्यांत मांडलें आहे. त्यांत राजवाडे यांस "युगपुरुष" म्हटलें पाहिजे असा मार्मिक अभिप्राय प्रगट केला आहे. टिळकांच्या जीवनचरित्राबद्दल ज्याप्रमाणे कित्येकांचे मनांत कायमचे दुर्ग्रह बसून गेलेले दिसून येतात तसेंच कांही अंशीं राजवाड्यांच्या बाबतींत झालें आहे.







अनुक्रमणिका

राजवाड्यांच्या सर्व चरित्राची मीमांसा खरोखरीच फार बोधपर होईल आणि तशी ती करण्याचा आमचा हेतुहि पण आहे. खानोलकरांच्या या प्रबंधांतील अनेक विधानांची चर्चा करण्यासारखी आहे. तथापि येथे इतकी सवड नाही. उदाहरणार्थ, पान ४३ वरील मेणोली दप्तर याबाबतची हकीकत. तें दप्तर मावजींच्या हातीं पडलें हें म्हणणें बरोबर नाही, व त्यांनी पारसनीस यांचेकडून त्यांतील बरेंच प्रसिद्ध केलें हें म्हणणेंहि बरोबर नाही. पान २४ व २५ यांवरील विधानें पुष्कळ सैल आहेत. भांडारकर यांची दैनंदिनी इंग्रजीमध्ये असे. पण येवढे विष्णुशास्त्री चिपळूणकर मराठी भाषेचे शिवाजी त्यांची स्थिति काय होती? त्यांनी आपल्या बंधूस लिहिलेलीं खाजगी पत्रें आणि आपल्या रोजनिशींतील टिपणें कितीतरी इंग्रजींत लिहिलीं आहेत. मग याची मीमांसा कशी करावयाची? राजवाडे यांचा मराठी भाषेच्या वैभवासंबंधीचा "प्रारंभीचा आशावाद जबर होता. पण पुढे तो मावळला" (पृष्ठ ७१) हें विधानहि बरोबर नाही आणि या विधानाच्या आधारार्थ म्हणून देतां येण्याजोगें जें राजवाड्यांचें शारदोपासक सम्मेलनप्रसंगीचें अध्यक्षीय भाषण त्याचा खुद्द रा. खानोलकर यांनींच खरा अर्थ व अभिप्राय दाखवून दिला आहे, कीं तो केवळ "भयसूचक इषारा होता". राजवाडे यांचा पीळ आणि आशावाद कधींच डळमळला नाही.

पृष्ठ ८७ वर रा. खानोलकर यांनी केलेलें एक विधान अत्यंत विस्मयजनक आहे. ते म्हणतात, राजवाडे-स्मारक-मंदिर "स्थापन न होतें तर राजवाड्यांनी आपली सर्व हयात खर्च करून जी प्रचंड ऐतिहासिक साधनसंपत्ति जमली ती कोठल्या कोठें नष्ट होती". रा. खानोलकर यांनी हें विधान करितांना यत्किंचितहि विचार केला नाही असें म्हणणें प्राप्त आहे. खुद्द राजवाडे यांनी जें भारत-इतिहाससंशोधक-मंडळ स्थापन केलें तेथे राजवाड्यांनी जमवलेली आणि आपल्याजवळ ठेवलेली सर्वच काय पण त्याच्या चौपटहि सामग्री स्वस्थपणें व सुरक्षितपणें सहज संग्रहून ठेवतां आली असती. वास्तविक अत्यंत महत्वाची अशी ऐतिहासिक सामग्री राजवाड्यांच्या अखेरीच्या काळांत जी त्यांच्या संग्रहीं शिल्लक राहिली ती प्रचंड नव्हती. त्याचप्रमाणे त्यांनी आपल्या हयातींत प्रसिद्ध केलेली बहुमोल सामुग्री अखेरीस त्यांचेजवळ असलेली आढळून आली नाही. उदाहरणार्थ त्यांच्या पहिल्या खंडांतील पानिपतसंबंधाचीं अमूल्य साधनें हल्ली मूळ कोठें आहेत तेंच समजत नाही. राजवाड्यांच्या बहुतेक सर्वच खंडांची (प्रथम प्रथम छापलेल्या) मूळ साधनें शोधून काढून पुण्यास अगर धुळ्यास कोठें तरी संग्रहून ठेवण्याची खटपट झाली पाहिजे. परंतु दुर्दैवाने हीं मुळें हल्ली कोठें आहेत हेंच आपणांस समजत नाही.

राजवाड्यांच्या आठवणी लिहितांना कित्येकांनी जरी खुद्द राजवाड्यांचें बोलणें उतरून दिलें आहे तरी तसल्या बोलण्याचा खरा अर्थ दृढ परिचयाच्या अभावीं त्यांना लावतां आला नाही.








अनुक्रमणिका

राजवाडे आपल्या मासिक जमाखर्चाबद्दल आणि राहाणीबद्दल अनेक ठिकाणीं अनेक लोकांजवळ बोलत आणि त्यामुळे आता मागाहून आठवणी लिहिणारे परंतु प्रत्यक्ष त्यांच्या सहवासांत बराच काळ राहावयास न सापडलेले असे कित्येक आठवणीकार जें बोलून किंवा लिहून गेले आहेत तें बरोबर नाही. असो. राजवाडे ही एक अजब व्यक्ति होती यांत शंका नाही आणि तिच्या महनीय कामगिरीचा यथार्थ चित्रपट विशदपणें लोकांपुढे मांडण्याचें कार्य त्यांच्याच शाखेंतील कोणाकडून अधिकारीपणें जरी व्हावयाचें तरी तोंवर रा. साने किंवा रा. खानोलकर यांच्यासारख्यांचीं छोटीं पुस्तकें लहान पिढीला उपयोगी पडतील यांत आम्हांस संशय नाही. अशा छोट्या पुस्तकांच्या वाचनाने जर खुद्द राजवाडयांचें प्रतिभाशाली, प्रस्फुरक व प्रज्वलित वाङ्मय वाचावयाची प्रेरणा कोणास झाली, तर त्यायोगें त्यांची 'क्रिया तत्काल पालटेल' आणि आपल्याला नवा जन्म मिळाला असें त्यांना वाटेल यांत आम्हांस तरी संदेह नाही. 'युगपुरुष' अशानांच म्हणतात.

—संपादक.

**'शाळा सोडल्यावर' 'सॉक्रेटीस' आणि 'आगरकर' आणि 'गोखले आणि':**—[लेखक व प्रकाशक, पु. पां. गोखले, कऱ्हाड] तिन्हीं चोपडीं छोटीं, अर्धापाऊण आणा किंमतीचीं, म्हणून स्वस्त परंतु विद्यार्थ्यांस उद्बोधक व प्रेरक आहेत.

—संपादक.

**वांई प्राज्ञपाठशाळा १७ वें वार्षिकवृत्तः**— श्री. नारायणशास्त्री मराठे, आतां श्रीमत्केवलानंद स्वामी यांच्या 'तपाचें फळ' म्हटलेली वांईची प्राज्ञपाठशाळा या संस्थेचा हा सतरावा वार्षिक वृत्तांत आहे. संस्थेमार्फत धर्मकोशाचें जें उपयुक्त व महत्त्वाचें कार्य चालू आहे त्याची प्रगति वृत्तांतांत नमूद आहे. भोंवतालीं चाललेल्या आंदोलनाच्या ज्वाळाच नव्हे तर धगसुद्धा संस्थांच्या अस्तित्वास मारक होते यास्तव दुरून मिळेल तेवढा शेक ऊब राहण्यास अवश्य असेल तितकाच आपण घ्यावा हें अनुभवसिद्ध रहस्य आहे. त्याचें आकलन यथार्थ झाल्यानें धर्मकोशासारखें कार्य पुरें होणें अर्थातच सुकर व निश्चित होतें. संस्थेचे उद्देश फार मोठे व व्यापक आहेत. आणि कार्यकर्त्यांना भरपूर उत्साहानें आपल्याच कार्यांत गुरफटून टाकण्यास समर्थ आहेत. विद्वान् व धनिक मंडळींनी संस्थेस अवश्य तें साहाय्य केल्यास मोठें कार्य होणार आहे.

—संपादक.

**भाऊंच्या वीरकथा व पानिपत कुरुक्षेत्र वर्णनः**—[लेखक–शं. पु. जोशी, प्रकाशक–भा. वा. भट, राजवाडे सं. शो. मंडळ, धुळे, किं. १० आणे] इतिहास–संशोधनाच्या अनेक शाखा आहेत. त्यांतच दंतकथा, लोककथा, आख्यायिका वगैरेंचा समावेश होतो. अर्थात् अस्सल कागदपत्रांपेक्षा हीं साधनें कनिष्ठ






अनुक्रमणिका

दर्जाचींच होत, तरीहि त्यांचा संग्रह व अभ्यास करणें अवश्य आहे. मराठ्यांच्या इतिहासांतील अनेक प्रश्नांबाबत असल्या आख्यायिका, लोकगीतें वगैरेंचा अभ्यास अजून व्हावयाचा आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी, V. S. यांनी प्रथम गुच्छ व द्वितीय गुच्छ या नांवानें दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं होतीं. बाजीरावाच्या आख्यायिका या नांवाचें छोटें पुस्तक कै. अनंत वामन वर्वे यांनी प्रसिद्ध केलें होतें. ऐतिहासिक साधनें म्हणून असल्या आख्यायिका व लोकगीतें यांची किंमत, बखरी व पोवाडे यांच्याहून कमीच ठरेल. रा. जोशी यांचें प्रस्तुतचें पुस्तक आमच्या मतें पोवाडयांच्या संग्रहापेक्षा खालच्या प्रतवारींत घातलें पाहिजे.

पानिपतांविषयी अलिकडे पेशवे दप्तरांतून दोन महत्त्वाचे भाग प्रसिद्ध झाले आहेत, ते व राजवाडयांचा पहिला खंड हीं अव्वल दर्जाचीं साधनें होत. याच्या खालोखाल भाऊसाहेबांची बखर, व काशीराजाची बखर यांची प्रतवारी लागते. परंतु नुसत्या कागदी साधनाने इतिहासाचें काम पुरें होत नाही. आणि तेवढ्याच आधारावर काढलेले निष्कर्ष कायम व पक्के समजतां येत नाहीत. विशेषतः पानिपताच्या युद्धाचा अभ्यास करावयाचा असेल तर प्रत्यक्ष युद्धभूमीचा अभ्यास बारकाईने करणें अवश्य आहे. युद्धक्षेत्रांतील गांवें, नद्या, नाले, डोंगर, टेकडया, हवामान, जमिनीचें स्वरूप म्हणजे तिचा खडकाळपणा, पिकाऊपणा, तसेंच तेथील रेताड मैदानें अथवा दलदली इत्यादि सर्व गोष्टी विचारांत घ्याव्या लागतील. हा भौगोलिक अभ्यास झाला. या भौगोलिक अभ्यासाला युद्धशास्त्रीय अभ्यासाची जोड दिली पाहिजे. एवंच कागदपत्रें, युद्धभूमी व युद्धशास्त्र या सर्वांच्या अभ्यासाचा मेळ घालून काढलेले निष्कर्ष हेच खरे निष्कर्ष होऊं शकतील.

पानिपत युद्धासंबंधाने मराठी कागदपत्र— साधारणतः बरेच कागदपत्र— प्रसिद्ध झाले आहेत. परंतु अबदालीच्या पक्षाचे, तसेंच रजपूतांचे कागदपत्र, जाटांचे कागदपत्र इत्यादि कागदपत्र अद्यापि शोधावयाचे आहेत. युद्धभूमीविषयी म्हणावयाचें तर तिची स्थिति दीडशें वर्षांपूर्वी जी असेल तीच कांही उरलेली नाही. यमुना नदी भाऊसाहेब लढले त्यावेळीं जशी वहात होती तशी, अगदीं त्या जागेवरून आज वहात नसेल. गंगा, यमुना नद्यांचीं पात्रें कांही मैलांच्या अंतराने अलिकडे पलीकडे फिरत असतात. शेतें, रानें, मैदानें दलदली व उंचवटे यांतहि नदीच्या पात्राइतका नसला तरी थोडा बदल झाला असला पाहिजे. काळीपांढरीचीहि कोठें कोठें अदलाबदल झाली असेल. तथापि असे किती जरी फरक झाले तरी, स्थूलमानाने युद्धक्षेत्राचें स्वरूप बऱ्याच बाबतींत पानिपत युद्धकाळासारखें अजूनहि असावयास पाहिजे. आज ज्याप्रमाणे सूक्ष्म नकाशे आपणांला उपलब्ध असतात तसे त्या काळीं नव्हते. आणि जे कांही ओबडधोबड नकाशे त्यावेळचे हिन्दी लोक काढीत असत ते पानिपत क्षेत्रांविषयी अद्यापपावेतों उपलब्ध झाले नाहीत. रेनेल याचा नकाशा हा युरोपियन पद्धतीने काढलेला असा हिंदुस्थानचा पहिला विश्वसनीय सूक्ष्म नकाशा होय. पण पानिपत रणभूमीचा








अनुक्रमणिका

अभ्यास करण्यास याहून सूक्ष्म नकाशे पाहिजेत. रेनेलची मदत यांत फारशी होत नाही. समकालीन सूक्ष्म नकाशांचा अभाव हाहि आपल्या अभ्यासाला अडचणीची मर्यादा उत्पन्न करतो. युद्धशास्त्राविषयी बोलावयाचें तर त्याचा अभ्यास करणारे कॅ. मोडकां-सारखे एखादे गृहस्थ नुकतेच आढळूं लागले आहेत. आमची विद्यापीठें झाल्याशिवाय हीं असलीं कार्यें पार पडणार नाहीत.

प्रस्तुत पुस्तकाचे लेखक रा. जोशी यांचें लक्ष पुण्यास भा. इ. सं. मार्फत जी पानिपत व्याख्यानमाला झाली तीमुळे या विषयाकडे लागलें. इतिहासाच्या अभ्यासाला प्रत्यक्ष भूनिरीक्षणाची जोड दिली पाहिजे हें लक्षांत घेऊन रा. दि. वि. काळे यांच्या-मागून रा. जोशी यांनी पानिपतक्षेत्राचें भौगोलिक निरीक्षण केलें. बहुतेक सर्व प्रवास या रणक्षेत्रांत त्यांनी केला; आणि तो संथपणें पायाने केला. आणि जें दिसलें व पाहिलें त्याची नोंद करून घेतली. पानिपत रणभूमीजवळ गांवें आहेत, तेथे एकंदर स्थिति काय आहे, कांही आख्यायिका व गीतें पानिपतविषयी तेथे मिळतात किंवा कसें, मराठ्यांच्या व इतरांच्या संबंधाने काय समजुती लोकांत तेथे रूढ आहेत याचा त्यांनी शोध घेतला, व त्याचीं टिपणें केलीं. हीं सर्व टिपणें रा. जोशी यांनी आता पुस्तक-रूपाने प्रसिद्ध केलीं आहेत, आणि त्यालाच वर दिलेलें नांव ठेविलें आहे.

नांवांवरून उघडच होतें की, पुस्तकांत दोन भाग आहेत. एका भागांत पानि-पत व कुरुक्षेत्र यांच्याबद्दल माहिती आहे, आणि दुसऱ्या विभागांत भाऊसो व मराठे यांच्याबद्दल तिकडील लोकांत प्रसिद्ध असलेल्या कांहीं आख्यायिका व त्रुटिक गीतें आहेत. या आख्यायिकांतील एक समजूत; कुंजपुरचीं धान्याचीं कोठारें जाळल्याबद्दलचा शाप भाऊस बाधला याबद्दलची समजूत, एकाहून अधिक ठिकाणीं नमूद झाली आहे. ( पृष्ठ ३८ व ४७ ) तसेंच 'भाऊका घड्याळ' या नांवानें ओळखलें जाणारें एक भलें मोठें झंगट कीं, ज्याचा आवाज दोन मैलापर्यंत ऐकूं जात होता आणि जें मराठ्यांनी तेथेच टाकून दिलें म्हणतात, तें अद्यापि कुंजपुऱ्यांतील नबाबाच्या वाड्यांत आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे. जनकोजी, भाऊ व मराठे यांची आठवण अद्यापही तिक-डील लोक काढतात आणि भाऊका गीत या नांवाने प्रसिद्ध असलेल्या गीताचे कांही तुकडे म्हणणारे जाटभाट तिकडे अजून आढळतात ही फार कौतुकाची व अभिमानाची गोष्ट आहे. या भाटांच्या तोंडून ऐकलेल्या गीतांचे तुकडे रा. जोशी यांनी जमा करून या पुस्तकांत दिले आहेत ते वाचनीय आहेत. हीं गीतें आता कोणी फारशी म्हणत नाहीत. भाट तीं विसरून गेले आहेत. भाटांना त्याचा धड अर्थही सांगतां येत नाही. या पुस्तकांत ती नीटरीतीने छापलेलींही पण नाहीत. रा. जोशी यांनी दिलेले अर्थ आम्हांस कांही ठिकाणीं बरोबर वाटत नाहीत. उदा:-पृष्ठ ३० वर सुरजमल जाटाचे संबंधी उतरून दिलेल्या गीताचा अर्थ अगदीच चुकला आहे. सुरजमल जाटाने हिकमत सांगितली असा त्या गीताचा अर्थ नाही ॥ "गाजुद्दीन वजीरने हिकमत बतलाई ॥"






अनुक्रमणिका

असा स्पष्ट चरण आहे. त्याचा अर्थ गाजुद्दीन खानाने हिकमत दाखविली असा होतो. पुढील व मागील चरणांचे अर्थ असेच चुकलेले आहेत. पृष्ठ ४३ वर ॥ मेरा नवलख नेजा कोण सामनी आवे ॥ हा एक चरण आहे. त्याचा अर्थ माझें नऊलाख दक्षिणी भाले आहेत त्यांच्यापुढे कोण येईल असा आहे. हा अर्थ रा. जोशी यांना लागला नसावा. हा अर्थ त्यांनी दिलाच नाही ॥ सुयेके सुनके मसलके जस सावर गावें ॥ असा पुढील चरण आहे. त्याचा अर्थ सूर्याच्या समोर काजव्याने आपलें यश गावें ? अर्थात् याप्रमाणे माझ्यापुढे दुराणीची कीर्ति गावी; दुराणी म्हणजे मशकलें अर्थात् क्षुद्र मशक असा अर्थ दिसतो. शेवटचा चरण ॥ दख्खन तो सोई आवंगे जिन्होनो हर लावो ॥ याचा अर्थ दक्षिणेंत तर आम्ही त्यांचा पराभव करून, त्यास धरून आणून खुशाल झोंपत येऊं असा बसवतां येईल. पुस्तकांत दिलेला अर्थ बरोबर नाही. पृष्ठ ४५ वरील वर्णनात्मक गीताचा अर्थ सुद्धा थोडासा बसवतां येईल असें वाटतें. नाग नदीच्या पाण्यांत ( पाताळ ) मर्दन करणारे बहादर ( आपल्या अंगाचे घुसळण करणारे ), ज्यांच्या दातांत सोन्याचे चुडे भरलेले आहेत आणि ज्यांचे माथे उंच, भरलेले आणि अंकुश घेऊन ज्यांवर पेहेलवान बसलेले आहेत असे हत्ती. पुढला चरण मात्र लागत नाही. भाटांना मधले मधले चरणही पण आठवत नसावे असें दिसतें, त्यामुळे आणखी घोंटाळा झाला आहे व गीतांतील वाक्यें तुटलेलीं आहेत. मतलब इतकाच कीं, अधिक परिश्रमानंतर या गीतांचे अर्थ लावतां येतील. असो.

मल्हारराव होळकरांनी कुचराई केली असा प्रवाद तिकडे अद्याप प्रचलित आहे तो रा. जोशी यांनी नमूद केला आहे. तो जरी प्रवाद असला तरी चिंत्य आहे. रा. जोशी यांनी आपल्याला मिळालेली माहिती कसोशीने टिपून घेऊन पानिपतचें रणक्षेत्र पायांनी सर्व तुडवलें आहे. आज दीडशें वर्षांनंतरही मराठ्यांचा दरारा व भाऊंच्या पराक्रमाची आठवण तिकडे कशी टिकून आहे त्याची उत्तम कल्पना रा. जोशी यांच्या पुस्तकाच्या वाचनाने येते. रा. जोशी यांनी केलेलें काम चिकाटीचें व मेहनतीचें आहे आणि कोणाची विशेष मदत नसतां ते त्यांनी स्वयंस्फूर्तीने व अभिमानानें आपल्यास जमेल तसें पार पाडलें आहे. पानिपतविषयक कागदपत्रें व माहिती यांचा बारकाईने अभ्यास करून जर रा. जोशी किंवा इतर कोणी गृहस्थ पुन्हा तिकडे जातील तर त्यांस पुष्कळ उपयुक्त कामगिरी करतां येईल. तेथील प्रेमळ जनता रा. जोशांप्रमाणेच दुसऱ्यांचें स्वागत करील. तेथील भोळी जनता अजूनही धनाच्या आशेने खणत्या लावण्याचा आग्रह करील. तथापि जाणत्या माणसाने जर तेथील जनतेपुढे या पानिपतप्रसंगाची माहिती अस्सल कागदपत्रांच्या आधारें समजावून दिली तर तिकडील जनता अशा प्रयत्नाचे खचित स्वागत करील. होतकरू संशोधकांना रा. जोशी यांचा हा प्रयत्न निःसंशय अनुकरणीय आहे. खुद्द रा. जोशी यांच्या भेटींत त्यांना या विषयाची चटक लागल्याचें आम्हांस दिसून आलें आहे; आणि ही चटक त्यांचेकडून असेच प्रयत्न आणखी घडवून आणील अशी आम्हांस








अनुक्रमणिका

पक्की उमेद आहे. पुस्तकांत नकाशा जोडता आला नाही हें व इतर वैगुण्यें पुढील आवृत्तीच्या वेळीं दुरुस्त करून घ्यावीं अशी आमची सूचना आहे.

—संपादक.

**व्यायाम क्षेत्र व श्रीमंत महाराजसाहेबः—**[ लेखक-राजरत्न प्रो. माणिकराव, बडोदें, प्रकाशकः—शेठ हिरालाल छगनलाल, बाजवाडा, बडोदें, किंमत १। रुपया ] बडोद्याचे सुप्रसिद्ध व्यायामाचार्य माणिकराव यांनी वरील पुस्तक लिहिलें असून तें शेठ हिरालाल यांनी प्रसिद्ध केलें आहे. सदरहू पुस्तकांत व्यायामक्षेत्रांत श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांनी काय कामगिरी केली त्याची सचित्र व सविस्तर माहिती दिली आहे. पूर्वीचे सयाजीराव मल्हारराव महाराज व खंडेराव महाराज यांच्या कारकीर्दींतील पहिलवानांना मिळणाऱ्या आश्रयाची त्रोटक माहिती दिल्यावर हल्लींचे श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्या बालपणापासूनची त्यांची स्वतःची व्यायामाची आवड, श्रीमंत सौभाग्यवती महाराणीसाहेब व राजकुटुंबांतील इतर मंडळी यांच्या व्यायामप्रीतीबद्दल माहिती दिली आहे. पहिलवानांची दंगल, स्काउट-शिक्षण, व्यायामशाळांना, इमारतींना, उपकरणांना वगैरे आर्थिक साहाय्य, आरोग्यपालनासंबंधी केलेल्या तजविजी इत्यादिकांसंबंधाने माहिती देऊन तदनंतर व्यायामशिक्षण सक्तीचें करण्याबद्दल, तसेंच व्यायामाकडे होणारा खर्च वाढविण्याबद्दल वगैरे कांहीं सूचना केल्या आहेत. त्यांत चहाच्या दुकानांवर कर लादण्याची एक सूचना आहे. दारूबंदी व वेश्याउच्चाटणाबद्दल सूचना केली आहे. शाळांतील व्यायामशाळा वाटल्यास वाढवून बडोद्यांत निरनिराळ्या भागांत पोहण्याचे हौद व व्यायामशाळा विद्यार्थ्यांकरिता बांधण्याची सूचना केली आहे. कॉलेजांत देशी खेळांवर भरपूर खर्च होत नाही म्हणून तक्रार केली आहे. बडोद्यांत जुन्या प्रकारची व नव्या प्रकारची मल्लविद्या व व्यायामविद्या यांचा उत्तम प्रकारें उत्कर्ष झालेला आहे आणि याला महाराजांप्रमाणेच श्रीमंत आबासाहेब मुजूमदार व लेखक श्रीयुत माणिकराव यांच्या सारख्यांचेही परिश्रम कारण झाले आहेत. वज्रमुष्टि पहिलवान आधीच हिंदुस्थानांत फारसे कोठें नाहीत. ही जेठी विद्या जुन्या स्वरूपांतच जगविण्याविषयी लेखकाप्रमाणेच महाराजांना आमची सूचना आहे. तसें न केल्यास ही अपूर्व विद्या नष्ट होईल. या पुस्तकांत श्रीमंत सयाजीराव महाराज यांचें व्यायामाने बनलेलें घाटदार शरीर दाखविणारे कित्येक फोटो प्रसिद्ध केले आहेत, ते यापूर्वी कोठें पहाण्यांत आले नव्हते. श्री. माणिकरावांचा हा निबंध आणि तो छापण्याची श्री. मोदी यांची तत्परता हीं दोन्हीं वाखाणण्यासारखीं आहेत.

—संपादक.

**वाङ्मयमाला पुष्प दुसरेंः—** गद्यांत २४ व पद्यांत २३ उतारे घेऊन बनवलेली ही वाङ्मयमाला मुलांच्या अभ्यासक्रमांत समाविष्ट झाल्याने मराठी-वाङ्मयासंबंधाने विद्यार्थ्यांत प्रीति उत्पन्न करील असें आम्हांस खात्रीपूर्वक वाटतें.








अनुक्रमणिका

उताऱ्यांत विविधता तर आहेच पण सरसताही आहे. टीपांबद्दल एवढा इषारा पुरे कीं, शिक्षकांनी या कामीं काळजीने व कसून काम करून अशा पाठमालांच्या संपादकांचे हेतु पार पाडले पाहिजेत. विरागी यावर वैराग्ययुक्त अशा अर्थाची दिलेली टीप बदलून सोपी करावी ( पृष्ठ २९ गद्य ).

अभ्रपटल न्याय वगैरे ( पृष्ठ १२६ ) अशा स्थळीं टीपा अवश्य पाहिजेत. गद्यलेखकांचीं चित्रें दिलीं पण कवींचीं दिलीं नाहीत. असा पक्षपात कां ? पुस्तक विद्यार्थ्यांकरिता आहे आणि संपादकद्वयांचा अध्यापन हा व्यवसाय आहे, तेव्हा त्यांचा हात पुस्तकावर नेहमी फिरत राहील याबद्दल आम्हांस शंका वाटत नाही. अशा प्रकारच्या माला जितक्या निघतील तितक्या चांगल्या, म्हणजे मराठी वाङ्मयांतील अनेक उत्कृष्ट अशीं स्थळें आपापल्या भिन्न भिन्न रुचींस अनुसरून निरनिराळया संपादकांनी निवडलेलीं विद्यार्थ्यांस वाचावयास व शिक्षकांस शिकवावयास सापडतील.

—संपादक.

**कन्याविलापः—** कै० रसिकवर्य लक्ष्मणशास्त्री लेले यांच्या विदुषी कन्या सौ. राधाबाई साठ्ये यांनी आपल्या सहृदय पित्याच्या मृत्यूनिमित्त हा कन्याविलाप रचला आहे. यांतील ३० श्लोकांत सुमारे १५।१६ भिन्नभिन्न वृत्तें योजिल्यामुळे कवयित्रीचे परिश्रम दिसून येतात. पहिल्या श्लोकांत शोकावर लागोपाठ वन्हि व तद्विरुद्ध सागर यांचा आरोप केल्याने अनुचित संकर झाला आहे. तथापि पुढील ३।४।५ या पद्यांत भावनेचा ओघ सरळ वाहतांना दिसतो. २३ व्या श्लोकांत लक्ष्मणशास्त्र्यांच्या 'नेपथ्याची अभिरुचि' व २४ व्या श्लोकांत त्यांची 'शीघ्र चाल' इत्यादिकांचे उल्लेख शास्त्रीबोवांच्या परिचितांस हृद्य वाटतील. शोकरसाचा उत्कर्ष या काव्यांत जर दिसत नसेल तर त्याचा अर्थ इतकाच कीं, कविकन्येच्या भावनांच्या उद्रेकाचा मार्ग साहजिकच रुद्ध झाला आहे. असें असलें तथापि कवयित्रीची सुसंस्कृतता प्रसंशनीय आहे व त्यावरून कै. लेलेशास्त्री यांच्या खऱ्या रसिकवृत्तीला मोठें भूषण येत आहे.

—संपादक.

**सुबोध ( कोल्हटकर – विशेषांक ) :—** गोमंतकांतील मुगांव येथे निघणाऱ्या 'सुबोध' मासिकाने कित्येक महिन्यापूर्वीपासून श्रीपाद कृष्ण कोल्हटकर विशेषांक काढण्याचें ठरविलें होतें. तो अंक दुर्दैवाने कोल्हटकर वारल्यावर नुकताच प्रसिद्ध झाला आहे. अंकाचीं ९० पानें आहेत. रा. भा. वि. वरेरकर, प्रो. चिं वि. जोशी, रा. वि. स. खांडेकर, रा. किरात इत्यादि सुप्रसिद्ध लेखकांचे लेख या अंकांत आहेत. पुण्याचे रा. रा. प्र. कानिटकर यांना आलेलें कै. श्री. कृ. कोल्हटकर यांचें स्वतःचें पत्र या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. आपल्या सुधारणापर लेखनाचें समर्थन रा. कोल्हटकर यांनी सदरहु पत्रांत केलेलें अत्यंत महत्वाचें आहे. रा. कोल्हटकर म्हणतात, "सुधारणेचे गुण दाखविण्याचा प्रयत्न विनोदी लेखांनी केला." रा. खांडेकर यांनी आपल्या लेखांत कोल्हटकरांची कल्प-








अनुक्रमणिका

कता हें त्यांचें वैशिष्ट्य कसें आहे तें दाखविलें आहे. कोल्हटकरांच्या नाटकांचें महत्त्व आपल्या लेखांत रा. वरेरकर यांनी दाखविलें आहे. आणि "कोल्हटकर लाभले म्हणूनच आज आम्हा लोकांचें मराठी वाङ्मयांत अस्तित्व आहे." असा निष्कर्ष काढला आहे. प्रो. जोशी यांनी थोडक्यांत कोल्हटकर यांनी कला व नीति यांची सांगड घालून उक्काधारो मनस्सानम् (मनुष्यांस दिवटी धरणारा) अतएव गुरु ही पदवी कशी सार्थ केली हें दाखविलें आहे. इतर कित्येक लेखकांनी तात्यासाहेबांच्या अंगीं असलेला सुहृद्भाव आपले अनुभव सांगून वर्णिला आहे, तो अगदीं यथार्थच आहे. परंतु एकाहि लेखकाने ज्योतिर्गणितादि ग्रंथांत दिसून येणाऱ्या तात्यासाहेबांच्या विद्वत्तेचा परामर्ष घेतला नाही. असो. सुबोधचा हा अंक वाचनीय व संग्रहणीय झाला आहे.

संपादक.

"जयमंगला" — (काव्य. कवि—यशवंत. प्रकाशक— प्र. श्री. कोल्हटकर, बी. ए., मुंबई नं. ४ किं. १ रुपाया) भिन्न भिन्न वृत्तांत लिहिलेल्या लहान मोठ्या बावीस चुटक्यांत पुरी केलेली ही एक पद्यमय प्रेमकथा आहे. "एका राजकन्येवर तिच्या दरिद्री गुरूचें प्रेम बसतें, तीही त्याच्या प्रीतीला प्रत्युत्तर देते, पण तिच्या पित्याला हा प्रेमसंबंध पसंत न पडून तो त्या प्रेमिक कलागुरूला देहदंडाची सजा देतो" असें या प्रेमकथेचें कथानक आहे.

कथानकाचा विकास, विस्तार व विशदीकरण वर म्हटल्याप्रमाणे बावीस भिन्न भिन्न भावगीतांतून झालें असून कवीच्याच शद्बांत सांगावयाचें झालें तर त्यांतील "प्रत्येक कवन हें एक एक स्वतंत्र भावगीत आहे, पण त्याबरोबरच तें एका समग्र कथेचा अवयव आहे."

अशा प्रकारच्या कथा-काव्यांत कथानकाची बांधेसूद सुगमता व विकास हीं भावनाप्रकटनापेक्षा देखील अधिक महत्त्वाचीं असतात. कथानकांतील प्रसंगांचे व व विचारांचे दुवे जितके कार्यकारणभावाच्या संबंधांनी दृढतर व तर्कशुद्ध निगडित झाले असतील तितके तें काव्य अधिक मनोरंजक व वाचनीय ठरतें. ह्या दृष्टीने पहातां जयमंगला हें खंडकाव्य फारच ढिलें झालें असल्यामुळे तें वाचीत असतां पुढे पुढे वाचीत जाण्याची उत्सुकता वाचकाला वाटत नाही.

जयमङ्गलेंतील बहुतेक भावगीतें यशवंतांच्या लोकप्रियतेला साजतील अशींच आहेत. "विसंगतेंतील गूढां" तील भाषासौष्ठवाने रघुनाथ पंडिताची आठवण झाल्यावांचून राहणार नाही.

'मीं पाहिल्या अतुल मौक्तिक-रत्न-माला
त्यांची कधीं भुरळ ना पडली मनाला

३३३




अनुक्रमणिका

स्रष्ट्यास मी उलट दोष दिला सदैव
कीं निर्मिले न मणि काञ्चन का सजीव ?
आल्हेरुनी नृपसभेमधी गौरवाला
मी पाहिलें नृपतिच्या उजवी कडेला
तों खिन्न काञ्चन, सकम्प सबाष्प रत्नें
आलीं अकल्पित दिसून विना प्रयत्नें.

अशा प्रकारच्या कितीतरी सुंदर व सरस ओळी जयमंगलेंत सापडतात. परंतु भावनेची प्रचंड खळबळ किंवा उत्कंटता त्यांतून प्रतीत होत नाही; त्यामुळे जयमंगलेंतील भावगीतें यशवंताच्या इतर कांही भावगीतांप्रमाणे वाचकाच्या मनाची पकड घेऊं शकत नाहीत.

एकंदरींत भाषा व रचना शुद्ध असली तरी "विनयतेची" या सारखे अपप्रयोग किंवा "मजभोंवति मोर नाचले" या चरणांतल्यासारखे यतिभंगादि दोष अगदीच सापडत नाहींत असें नाहीं. पुस्तकाचें बहिरंग अत्यंत सुंदर व आकर्षक आहे. पुस्तकाची एक रुपया ही किंमत बहिरंगाच्या दृष्टीने योग्य असली तरी अंतरंगाच्या गुणाच्या मानानें वाचकांवर ओझें घालणारी आहे.

कें. नारायण काळे

**सुश्लोकगोविंद**:—[लेखक व प्रकाशकः-श्री. रा. चिं. श्रीखंडे, हुजूर वझीरांचा वाडा, कोल्हापूर, किं. १॥ रु.] कालिदासाच्या शाकुंतलाची जी लोकप्रियता तीच अल्पप्रमाणांत बंगकवि जयदेव याच्या गीत-गोविंदाची.आपल्या देशांतील व परकीय रसिकांच्या प्रशंसेला पात्र होणें, अन्य भाषांत भाषांतर होण्याचा बहुमान मिळणें, कविवर्य टागोरांसारख्यांच्या मनावर मोहिनी घालणें व सामान्य रसिकांच्याहि पाठाचा विषय होणें इत्यादि बाबींमध्ये दोहोंमध्ये मोठें साम्य आहे. पण त्यांतल्या त्यांत शाकुंतलाप्रमाणे गीतगोविंद हें नुसतें श्रृंगारपर काव्यच मानलें जात नसून त्यांतील आलंबन विभाव श्रीकृष्ण व राधिका असल्याने त्यांतील श्रृंगाराला भक्तीची मनोहर पार्श्वभूमि मिळाली आहे. हें त्याचें निराळें वैशिष्ट्य म्हणून सांगतां येईल. अशा या सुप्रसिद्ध 'गीतगोविंद' संस्कृत काव्याचा सदर "सुश्लोकगोविंद" हा मराठी श्लोकबद्ध अनुवाद आहे. पद्यमय व संगीतानुकूल अशा गीतगोविंदाचें भाषांतर श्लोकांतच व्हावें हें उचित असलें तरी तें तितकें सोपें नाही. व लिहावयास संतोष वाटतो की, सदर पद्यमय अनुवाद, एकंदरीने पाहतां, मूळ काव्याच्या कीर्तीला शोभेल असाच उतरला आहे.

काव्याचें तंतोतंत भाषांतर करतां न येणें हीच तर त्या काव्याच्या उत्कृष्टपणाची कसोटी. पण ही उच्च कसोटी थोडी बाजूस ठेऊन सर्वसामान्य व्यावहारिक दृष्टीने बोलावयाचें, तर काव्याचीहि उत्तम भाषांतरें असूं शकतात. मूळ काव्याचा आस्वाद चाखविणें हा त्याचें भाषांतर करण्याचा मुख्य हेतु मानल्यास ज्या भाषेंत तें भाषांतर करावयाचें त्या भाषेची मोडणी, तिच्यांतील कल्पना, यांकडे लक्ष देऊन तें





भाषांतर जरा ढिलें व मोकळें करण्याकडे कल असावा, ही दृष्टि अधिक संमत होण्यासारखी आहे. मुळाबरहुकूम श्लोकाला श्लोक, ओळीला ओळ व शब्दाला शब्दसुद्धा ठेवण्याचा अट्टाहास धरणें म्हणजे वरील हेतु बाजूस ठेऊन, आपल्यास शब्दाची कसरत करतां येते ही गोष्टच भाषांतरकाराने वाचकांस अधिक जोराने दाखविण्यासारखें होतें. पण आनंदाची गोष्ट ही की, सदर अनुवादांत ही प्रवृत्ति मुळींच दिसून येत नाही. जयदेवाच्या गीतगोविंदाच्या भाषेचा पहिला ठळक व कोणाही वाचकाच्या नजरेस येणारा विशेष म्हणजे तिची अनुप्रासप्रचुरता. ही सर्वच मराठींत ओतूं म्हटलें तर तो वेडेपणा होईल. हे व असे अनेक विधि-निषेध पाळून डॉ० श्रीखंडे यांनी हें अनुवादाचें काम मोठ्या कौशल्याने व रसिकतेने पार पाडलें आहे. आपला श्लोक पूर्ण करण्यास त्यांना पदरचा थोडा मजकूर मुळाहून अधिक घालावा लागला आहे. (उ. पान ४२ श्लो. ६, ७ व ८ पहा) पण तो त्यांनी मूळच्या रसाला पोषक होईल अशा बेताने घातला आहे. तसेंच कांही नवीन अनुप्रास भाषांतरास शोभा देणारे घातले आहेत. पान ४४ श्लोक १ येथे 'ळे' पहा).

अनुवादांतील मराठी भाषा प्रायः शुद्ध व रसपरिपोषक असून, तिच्यावर वामनी वळणाचा ठसा स्पष्ट उमटलेला दिसतो. वामन पंडितांनीहि अशींच श्रृंगारपर प्रकरणें खुलवून लिहिलीं असल्याने त्याच भाषेचा व कल्पनांचा साज आपल्या भाषांतरावर चढवून देण्यांत श्रीखंडे यांनी मोठी योजकता दाखविली आहे. त्यामुळे सदर पुस्तक वाचीत असतां आपण एक स्वतंत्रच मराठी काव्य वाचीत आहों अशी वाचकाची कल्पना होते.

थोड्या सूक्ष्मपणें पाहिलें तर कांही शब्द व भाषांतरांतील भाषेची कांही ठिकाणची योजना आहे त्याहून अधिक बरी असावयास पाहिजे होती असें वाटतें. पान ४ वरील पहिल्याच श्लोकांतील "मदन--मुंग्या" पाशीं थोडें खटकल्यासारखें होतें. तो ास व ती कल्पना या दोहोंचेंहि औचित्य उलगडत नाही. तसेंच पान २६ श्लोक . मधील "मौल्यवान्", पान २७ श्लोक २० मधील "सुस्कारे" इत्यादि शब्द गद्यप्रयुक्त असल्याने रसाला बाधक वाटतात. "रत्न-सांठा" या सारखे कांही गंगाजमनी समास व यमकानुप्रासाच्या धांदलींत "हरि तरि **अभिमानी** राग मानील **मानी**" अशी द्विरुक्ती क्वचित् नजरेस येते. एके ठिकाणीं तर (पान २५ श्लोक ८ मध्ये) 'राधिके! हृदयिं नाहिं न माया?" यांत 'ना' या प्रश्नार्थकासाठीं 'न' घालावें लागलें आहे असें वाटतें. तसेंच कांही ठिकाणीं प्रत्येक ओळींत संबोधनें "राधिके, राधे" अशीं घातलीं आहेत. पण अशीं स्थळें विरळ असून तीं भाषांतरकाराच्या दुर्लक्षापेक्षा या कामाचा कठीणपणाच दाखवितात हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

पुस्तकास जोडलेली प्रस्तावना फार परिश्रमपूर्वक लिहिली असून तींतील माहिती जितकी पूर्ण (exhaustive) आहे तितकीच ती चिकित्सकपणें व सहृदयतेने जुळविलेली दिसते. श्रीमंत बाळासाहेब पंत, औंध संस्थानाधिपति, यांच्या "कांग्रा-






अनुक्रमणिका

व्हेली चित्रपद्धती " वरील सुंदर निबंधाने त्यांच्याच संग्रहांतील सुबक चित्रांनी व मोहक छपाईने पुस्तकाचें बाह्यांग त्याच्या अंतरंगाला साजेसेंच उठावदार बनविलें आहे. अनुवादाबरोबरच मूळ संस्कृत गीतगोविंदहि छापल्याने हीं दोन्हीं एकमेकांशीं ताडून पहाण्याची सोय झालेली आहे. सदर पुस्तक अवश्य संग्राह्य असून त्याने मराठींतील अनुवाद-वाङ्मयांत एक फार मोलाची भर टाकली आहे यांत शंका नाही.

के. ना. वाटवे.

**आयुर्वेदीय–शारीरम्** Or Sushrutic Anatomy:— [ प्रकाशक:– डॉ. मो. ना. नातू व डॉ. मा. पु. जोशी, चिटणीस, आ. सं. मंडळ, ९१२ सदाशिव पेठ, पुणें २ ] कोणत्याहि शास्त्राची वाढ होण्यास त्याचें संशोधन चिकित्सा–पद्धतीनें व्हावें लागतें. तें चिकित्सा-पद्धतीनें झालें म्हणजे त्यांतील तत्त्वांचा निश्चय होतो, व मग त्या तत्त्वांची वाढ झपाट्याने होऊन तीं सर्व मान्य होतात. आर्यवैद्यकाबद्दल हिंदुस्थानचे लोकांत दिवसानुदिवस जास्त श्रद्धा उत्पन्न होऊं लागली आहे. ही गोष्ट सर्व हिंदुस्थानामध्ये निघणाऱ्या आयुर्वेदीय विद्यालयांवरून व कारखान्यांचे प्रसारावरून दृष्टोत्पत्तीस येत आहे. आर्यवैद्यकाची वाढ होण्यास संशोधनाची अत्यंत जरूर आहे. ही गोष्टही दिवसानुदिवस वैद्यलोकांचे, तसेंच आर्यवैद्यकाभिमानी डॉक्टरलोकांचे लक्षांत येऊं लागली आहे व तदनुरूप प्रयत्न बंगाल, मद्रास वगैरे प्रांतांतून होत आहेत. त्याप्रमाणेच आपल्या मुंबई इलाख्यांत असा जोराचा प्रयत्न सुरू झाला आहे. त्याचें दृश्यफल म्हणजे 'आयुर्वेदीय शारीरम्' या नांवाचें छोटेखानी पण अत्यंत महत्त्वाचें असें पुस्तक बाहेर पडलें हें होय. संशोधन-कार्यास एकनिष्ठपणें वाहून घेणारीं माणसें लागतात व त्यांना कार्य करण्यास एखादी संस्था लागते. या नियमानुसार मुंबईप्रांतीय-आयुर्वेद-संशोधक मंडळ स्थापन झालें आहे व त्याचे तर्फे हें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. सदर मंडळाने शारीर-शास्त्र Anatomy हें प्रथम हातीं घेतलें आहे, कारण शारीरशास्त्राची पद्धतशीर व शास्त्रशुद्ध माहिती झाल्याशिवाय पुढे इंद्रियविज्ञान, शस्त्रक्रिया वगैरेंबद्दल माहिती बरोबर कळणार नाही. आपले आयुर्वेदांत शारीरशास्त्र व शस्त्रक्रिया यासंबंधीं सर्वांगीण माहिती देणारा असा 'सुश्रुत' हा एकच ग्रंथ आहे. हजारोंवर्षांपूर्वी हें शास्त्र हिंदुस्थानांत फार प्रगतिपर होतें पण बौद्धधर्माचा जसजसा प्रभाव होऊं लागला तसतशी या शास्त्राची गळेचेपी झाली, शस्त्रक्रिया बहुतेक संपुष्टांत आली व या शास्त्रावरील ग्रंथ नाहीसे झाले अगर परदेशांत गेले! अशाप्रकारें या शास्त्राची दुर्दशा झाली! पुढे हा देश पारतंत्र्यांतच पडत गेल्यामुळे राष्ट्रीय वैद्यक नामशेष होत गेले असेल हें निराळें लिहिण्याचें कारण नाही. हल्ली पुनः याच आयुर्वेदास चालना मिळाली आहे व जसजसें संशोधन होत आहे तसतसें यांतील आयुर्वेदिक शारीर हें बहुतांशीं बरोबर आहे व शास्त्रीय कसोटीस उतरणारें आहे असें मोठमोठ्या डॉक्टर लोकांनाही कबूल करावें लागलें आहे.





सुरवातीस हें सांगून ठेविलें पाहिजे कीं, या पुस्तकाचें बहुतेक श्रेय संशोधन कार्यास वाहून घेणारे पुण्याचे भिषग्वर **गंगाधरशास्त्री जोशी** यांना आहे. टिळक-महाविद्यालयांत आयुर्वेदाचे ते अध्यापक होते; त्यांच्या पुष्कळ वर्षांच्या दीर्घोद्योगाचें, चिकाटीचें व अनेक ग्रंथांच्या परिशीलनाचें फल म्हणजे हें पुस्तक होय! हें पुस्तक शारीरशास्त्राची रूपरेखा दाखविणारें आहे व पुढे जो शारीरशास्त्रावर ग्रंथ निर्माण होणार आहे त्याचा हा पाया आहे. या शास्त्राची शास्त्रीय प्रणाली यांत दिली आहे. पाश्चात्य वैद्यक-शास्त्रांमध्ये शोध जास्त होत आहेत व तें शास्त्र फार पुढे गेलेलें आहे. अशाशीं टक्कर देण्यास त्या शास्त्रांतील सिद्धांत आयुर्वेदाशीं कसें जुळतात हें या अमदानींत सुशिक्षितांपुढे मांडल्याशिवाय त्यांचें समाधान होणार नाही. म्हणून पाश्चात्य वैद्यकाची व आयुर्वेदाची तुलनात्मक माहिती या पुस्तकांत दिली आहे. त्याचें सूक्ष्म निरीक्षण केलें म्हणजे असें दृष्टोत्पत्तीस येईल कीं, आयुर्वेदांत इंग्रजी वैद्यकापेक्षा तात्त्विकदृष्ट्या कित्येक प्रसंगीं फार सूक्ष्मपणें विवरण केलें आहे व आपलें शास्त्रच कालांतराने पुढे येणें जरूर आहे. राजाश्रयाभावी व द्रव्याभावी ही गोष्ट केव्हा होईल हें सांगतां येणार नाहीं. पण Rhinoplasty सारखी चमत्कृतिजन्य शस्त्रक्रिया इंग्रजी शास्त्रांत आपल्यातूनच उचलली आहे, यावरून अशी आशा करणें व्यर्थ होणार नाही.

या पुस्तकाने महत्त्वाचें कार्य तडीस गेलें आहे, तें म्हणजे सर्वसंमत होईल व शास्त्रानुरूप होईल अशी शास्त्रीय परिभाषा व वर्गीकरण ठरविलें आहे ही होय. याबद्दल कांही मतभेद आहेत. बंगालचे महामहोपाध्याय डॉ. **गणनाथ सेन** यांनी आयुर्वेदाची फार प्रशंसनीय सेवा केली आहे. त्यांनी शारीरशास्त्रावर व इंद्रियविज्ञान शास्त्रावर इंग्रजी ग्रंथांचे धर्तीवर संस्कृतामध्ये ग्रंथ लिहिले आहेत. त्यांमध्ये त्यांनी वैद्यशास्त्रांतील कित्येक शब्दांची परिभाषा आपल्या मताप्रमाणे ठरविली आहे. इतर प्रांतांतील वैद्यांचें संशोधनाकडे जसजसें जास्त लक्ष जाऊं लागलें व तेही चिकित्सापद्धतीने जसजसे जास्त विचार करूं लागले, तसतसे त्यांतील कित्येकांना डॉ. गणनाथ सेन यांनी केलेले अर्थ विपरीत आहेत व ते सर्व ठिकाणीं सारखे लागू पडत नाहीत असें आढळून आलें. भिषग्वर **गंगाधरशास्त्री जोशी** यांनी इंग्रजींत स्वतंत्र लेख प्रसिद्ध करून त्यांचीं मतें खोडण्याचा प्रयत्न केला. त्यावर उत्तरें प्रत्युत्तरें झालीं व हा वादाचा विषय होऊन बसला आहे. त्या मंथनामध्ये एक चांगला फायदा झाला. तो म्हणजे प्रस्तुतचें शारीर-शास्त्राचें पायारूपीं पुस्तक तयार झालें! वादांतील विषयाचें विवेचन करण्याचें हें स्थल नव्हे. प्रस्तुत पुस्तकांत जी पद्धति स्वीकारली आहे ती मीमांसाशास्त्राप्रमाणे आहे. शास्त्रीय व्याख्या व शब्दांचे अर्थ त्या ग्रंथांतील सर्व प्रकरणांत सारखे उपयोगांत आणले गेले पाहिजेत, तात्कालीन इतर महत्त्वाचे वैद्यकग्रंथांत त्याच अर्थाने ते उपयोग आणले पाहिजेत, व आधुनिक प्रत्यक्ष शारीराशीं ते जुळले पाहिजेत. अशा तऱ्हेने सर्व गोष्टींचा पूर्ण विचार करून या पुस्तकांत व्याख्या व शब्दप्रयोग मुख्यतः '**सुश्रुत**' या ग्रंथानुसार ठरविले गेले आहेत.








अनुक्रमणिका

सदर पुस्तक सुप्रसिद्ध सत्पुरुष व पाश्चात्य निरनिराळ्या शास्त्रांतील विशेषतः वैद्यशास्त्रांतील तज्ज्ञ असे कै० **आण्णासाहेब पटवर्धन** यांना समर्पण करण्यांत आलें आहे. त्यांचा फोटोही प्रथम देण्यांत येऊन त्याखाली योग्य शब्दांत त्यांचे गुणवर्णन करण्यांत आलें आहे. प्रस्तावनादाखल दोन शब्द मुंबईचे डॉ. पोपट प्रभुराम, डॉ. सरदेसाई, डॉ. सहस्रबुद्धे, वगैरे डॉक्टर महाशयांनी लिहिले आहेत. त्याचप्रमाणे पुण्याचे वैद्य आयुर्वेदाचार्य नानलशास्त्री, भिषग्वर्य सानेशास्त्री, नगरचे वैद्य पंचानन गंगाधरशास्त्री गुणे, मुंबईचे वैद्यतीर्थ आपाशास्त्री साठे, नासिकचे वैद्यभूषण वामनशास्त्री दातार, जबलपूरचे भिषग्वर्य डेगवेशास्त्री वगैरें विद्वद्वर्यांनी संस्कृतामध्ये प्रास्ताविक दोन शब्द लिहिले आहेत.

सुरवातीस सुश्रुत शारीरांतील विषय, चरक व अष्टांगहृदय या ग्रंथांतील विषयांशीं तसेंच पाश्चात्य शारीरशास्त्रांतील विषयाशीं कसे समानार्थक आहेत हें दाखविणारें एक तुलनात्मक कोष्टक दिलें आहे. या पुस्तकाचीं ११ प्रकरणें आहेत तीं अशीं:—

१ षडंगशारीरम्, २ कलाप्रकरणम्, ३ सप्तधातवः, ४ अस्थिप्रकरण ५ संधीप्रकरणम्, ६ स्नायुप्रकरणम्, ७ पेशीप्रकरणम्, ८ पंचप्रकारकाः प्रणाल्य ९ शिरावर्णविभक्तिः, १० धमनीव्याकरणम्, ११ स्रोतोविमानम्.

या प्रत्येक प्रकरणांत त्या त्या विभागाचे पोटविभाग सविस्तर देण्यांत येऊन त्याचे संस्कृत व इंग्रजी अर्थ दिले आहेत. तसेंच पाश्चात्य वैद्यकाशीं साम्य दाखविणारे अर्थात्मक असे आर्यवैद्यक ग्रंथांतील उतारे दिले आहेत. त्यावरून शास्त्राचा आधार कळून येण्याजोगा आहे. ग्रंथांत् फार क्वचित् विरुद्ध अर्थदर्शक कांहीं वाक्यें आढळतात त्यांचा समन्वय कसा करणें जरूर आहे हेंहि दाखविलें आहे. 'धमनी' या शब्दाबद्दल बराच वाद असल्यामुळे त्याबद्दल थोडें अधिक विस्तृत विवेचन करण्यांत आलें आहे. सदर पुस्तक इंग्रजी व संस्कृत भाषेंत असल्यामुळे त्याचें थोडें तरी ज्ञान असणाराशिवाय निवळ मराठी वाचकास त्याचा उपयोग करून घेतां येणार नाही. असो.

आर्यवैद्यकाबद्दल डॉक्टर लोकांमध्ये जास्त जिज्ञासा उत्पन्न होत आहे हें सुचिन्ह आहे. डॉक्टर लोक एका तऱ्हेच्या वैद्यकांत तज्ज्ञ असतात. अशांनी आपलें राष्ट्रीय जें आर्यवैद्यक त्यावर श्रद्धा ठेवून तें वाचण्यास जर सुरवात केली तर आर्यवैद्यकाची लवकर प्रगति होईल. कारण त्यांना आर्यवैद्यकाच्या सूत्ररूपांत असणाऱ्या ग्रंथांतील खरे अर्थ बरोबर व लवकर समजतील. ते तसें त्यांना समजले म्हणजे शास्त्रीय पद्धतीने आर्यवैद्यक ग्रंथांचें यथायोग्य स्पष्टीकरण ते करूं शकतील. तरी डॉक्टर लोकांनी या विषयाकडे जास्त लक्ष द्यावें व संशोधन करण्याचे मार्गास लागावें. सर्वांनी असे प्रयत्न केल्यास प्रस्तुत पुस्तकाचे आधारावर मोठा शारीरशास्त्राचा ग्रंथ होणार आहे. तो








अनुक्रमणिका

शीघ्रतर गतीने बाहेर पडून आपल्या वैद्यकाचें महत्व जगाचें निदर्शनास आणून देईल. मुंबई प्रांतीय-आयुर्वेद-संशोधक-मंडळाने हा महत्वाचा प्रयत्न केला आहे त्याकडे मुंबई कायदे कौन्सिलचे सभासद व प्रांतिक सरकार यांनीही लक्ष देणें व त्यास जरूर ती मदत करणें अत्यंत जरूरीचें आहे.

भाऊराव वैद्य.

---

## रद्दींतील रत्नें

रत्न १० शोधक—संपादक.

### हिंदुधर्मरक्षणाविषयीं

ज्ञानोदय, १६-५-१८५३

गेल्या महिन्याच्या २५ वे तारखेच्या ज्ञानप्रकाश पत्रांत येणेंप्रमाणें लिहिलें आहे:—

" कलकत्त्यांतील सरकारी विद्यालयांत बैबल शास्त्र चालू करावें, असें सरकारनें ठरविल्यावरून तेथील बाबू म्हणजे जहागीदार, वतनदार लोकांचे स्वधर्माचा ऱ्हास होतो असें मनांत पक्केपणीं आलें; तेव्हां त्या लोकांनीं एक हिंदु विद्यालय नवें जसें फार्शी लोकांनीं स्थापिलें आहे तसें स्थापिलें. त्यावर तीन साहेब मुख्य गुरु नेमिले आहेत. आतां ह्या गोष्टीवरून आमच्या पुणेकर सावकारादि ब्राह्मण व हिंदु लोकांस बोध व्हावा, कीं, एथें ज्यापेक्षां सरकारनें एथील संस्कृत पाठशाळेंत ब्राह्मणाखेरीज अन्य जातींच्या पुरुषांस शास्त्रें पुराणें शिकवावीं म्हणून कायदा ठरवून तो अमलांतहि आणिला. तर आतां सर्वांनीं एकत्र होऊन स्वधर्म व आचार रक्षणार्थ एक नवी शाळा ब्राह्मणांकरितां कां काढण्याची तजवीज करूं नये ? धर्माभिमान व जात्यभिमान, अशा प्रसंगीं जर धरीत नाहींत तर काय लाडूबाजींतच धरणार ? पोकळ ग्रामण्यें करावीं त्यापेक्षां कृष्णंभटासारिख्या धर्माभिमान्यानें अशी शाळा काढण्याच्या प्रयत्नांत लागावें हें आम्हास ठीक दिसतें. नाहींपेक्षां उगीच स्वस्थ बसून विलाप करीत घरीं बसावें. "

हल्लीं हिंदुधर्म रक्षण करणें कठीण पडलें आहे आणि त्याविषयीं कांहीं तरी चांगला उपाय योजला पाहिजे खरा. कलकत्यांतील लोकांनीं धर्मरक्षणाकरितां स्वतंत्र शाळा काढून तेथें तीन साहेब गुरूच्या कामावर ठेविले आहेत, आणि हें त्यांनीं बरें केलें. परंतु अशा शाळांच्या योगानें धर्माचें संरक्षण होईल असें दिसत नाहीं. हिंदूधर्म रक्षण करणें ज्यांच्या मनांत आहे त्यांस इंग्रजी शाळा नकोत व त्यांनीं इंग्रजी शिकूं नये. साहेब लोक म्लेच्छ आहेत म्हणून तशांजवळ जाऊं नये व त्यांचें बोलणें देखील ऐकूं नये, केवळ कानांत बोटें घालून बसावें असा उपाय ठरविला पाहिजे. आणि असा जर सक्त उपाय हिंदूंनीं केला तरच थोडे दिवस कांहीं हिंदुधर्म राहिला तर राहील, युक्ति नाहीं.





# परिषद्वार्ता



**कार्यकारी मंडळः**—मागील परिषद्वार्ता लिहिल्यानंतर (९।५।३४) ता. १३।५।१९३४, ५।६।१९३४ आणि २६।७।१९३४ या दिवशीं कार्यकारी मंडळाच्या तीन सभा झाल्या. पैकीं पहिल्या सभेंत सहविचारिणी सभा, बडोदें, या संस्थेकडून बडोद्यास साहित्यसंमेलन भरविण्याबाबत जो परिषदेशीं रीतसर पत्रव्यवहार झाला तो पाहून सदर संस्थेस एकोणिसावें महाराष्ट्र साहित्य संमेलन भरविण्यास मंजुरी देण्यांत आली. तसेंच परिषदेचे १९३३–३४ सालचे हिशेब हिशेबतपासनीसांच्या शेऱ्यावरून मंजूर करण्यांत आले. दुसऱ्या सभेंत कै. श्री. कृ. कोल्हटकर व कै. बा. मा. आंबेकर आणि तसेंच परिषदेचे तहाहयात सभासद कै. द. वि. पेंढरकर यांच्या मृत्यूबद्दल दुखवट्याचे ठराव करण्यांत आले. परिषदेचा १९३३–३४ सालचा अहवालहि मंजूर करण्यांत आला. त्याचप्रमाणे बडोद्याच्या आगामी संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी ज्या सूचना आल्या होत्या त्यांचा विचार करून या सन्मानासाठी पुढील नांवें अनुक्रमाने सुचविण्यांत आलीं:—(१) श्री. ना. गो. चापेकर, (२) श्री. द. वि. आपटे, (३) श्री. गो. स. सरदेसाई, (४) श्री. ना. के. बेहेरे, व (५) श्री. द. वा. पोतदार. याशिवाय श्री. न. चिं. केळकर यांचेंहि नांव विनानुक्रम सुचविण्यांत आलें. तिसऱ्या सभेंत कै. ख. चिं. मेहेंदळे यांजबद्दल दुखवट्याचा ठराव करण्यांत आला. याशिवाय, परिषदेच्या खजिनदाराजवळ हल्लीं जी शिल्लक जमली आहे त्यापैकीं कायमनिधीची व तहाहयाताहून अधिक उच्च प्रकारच्या सभासदांच्या वर्गणीची संपूर्ण रक्कम व तहाहयात सभासदांच्या वर्गणीची निम्मी रक्कम मिळून होणारी रक्कम ट्रस्ट अॅक्टप्रमाणे मान्य असणाऱ्या सिक्युरिटींमध्ये गुंतवून ट्रस्टींच्या नांवें करून द्यावी; आणि उरलेली तहाहयातीची निम्मी रक्कम सदरप्रमाणेच पण खजिनदारांच्या नांवें गुंतवावी असा महत्त्वाचा ठरावहि मान्य करण्यांत आला.

**नियामक मंडळः**—नियामक मंडळाची सभा ता. ५।६।३४ रोजीं दुपारीं ४ वाजतां परिषदेच्या कचेरींत भरली होती. सभेस २२ सभासद हजर असून अध्यक्षस्थानीं डॉ. शं. पु. आबारकर (कलकत्ता) यांची योजना झाली होती. प्रथमतः कै. कोल्हटकर, कै. आंबेकर व कै. पेंढरकर यांजबद्दल दुखवट्याचे ठराव झाल्यानंतर १९३३–३४ सालचे परिषदेचे हिशेब व अहवाल मंजूर करण्यांत आले. तसेंच कार्यकारी मंडळाने तयार केलेलें १९३४-३५ सालचें परिषदेचें अंदाजपत्रकहि मंजूर करण्यांत आलें. (हें अंदाजपत्रक याच अंकांत इतरत्र प्रसिद्ध केलें जात आहे.) परिषदेचें नामांतर करावें ही रा. नी. शं. नवरे यांची सूचना बहुमताने नामंजूर झाली.





याशिवाय, नियामक मंडळांतील रिकाम्या जागा पुढील निवडणुकीपर्यंत रिकाम्या ठेवाव्या असें ठरलें आणि नागपूर संमेलनांतील ठरावांची परिषदेच्या कार्यकारी मंडळाने यथाशक्ति केलेली अंमलबजावणी मान्य करण्यांत आली.

**संमेलनः**—परिषदेने संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी सुचविलेल्या नांवांपैकीं परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. ना. गो. चापेकर यांची बडोद्याच्या स्वागतसमितीने निवड केली आणि रा. नानासाहेब चापेकरांनीहि या निवडीस शेवटीं मान्यता दिली हें वृत्त आतां सर्वश्रुत झालेंच आहे. श्री. चापेकरांची निवड ही बडोदेकरांच्या परिषदेबद्दलच्या वाढत्या आस्थेचीच द्योतक तर आहेच; पण याशिवाय श्री. नानासाहेबांनी आपल्या कारकीर्दींत परिषदेची जी अमोल सेवा केली तिचाहि हा सन्मान आहे हें उघड आहे. म्हणून या निवडीबद्दल रा. नानासाहेब चापेकर यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

बडोद्याच्या स्वागतसमितीने संमेलनाच्या अध्यक्षांबरोबरच कांहीं विभागाध्यक्षांचीहि निवड केली आहे. परंतु या बाबतींत अजून अधिकृत आणि समग्र माहिती परिषदेकडे आली नसल्याने त्याविषयी कांही प्रसिद्ध करतां येत नाही.

**पत्रव्यवहार, प्रचार इत्यादिः**—प्रि. ध. रा. गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या परिषत्संमेलन उपसमितीचें बरेंच कार्य गेल्या तिमाहींत झालें आहे. समितीच्या सभासदांपैकीं जे सद्गृहस्थ पुण्यास गेल्या उन्हाळ्याच्या सुट्टींत आले होते त्यांस पाचारण करून अध्यक्षांनी जी प्रास्ताविक चर्चा घडवून आणिली त्या चर्चेंत परिषद् व संमेलन यांच्या परस्परसंबंधाविषयी कांही सामान्य तत्त्वें मान्य झालीं. या तत्त्वांस अनुसरून समितीने करावयाच्या शिफारशींचा कच्चा खर्डा तयार करण्यांत आला आणि तो उपसमितीच्या सभासदांकडे चर्चेसाठी पाठविण्यांत आला. ही चर्चा आता बहुतेक पूर्ण झाली असून सर्वमान्य असा मसुदा लवकरच सभासदांकडे सहीस जाईल.

गोवें-हैद्राबादेकडे शिष्टमंडळें पाठविण्याच्या बाबतींत परिषदेच्या कचेरीकडून व्हावयाचें तेवढें काम झालें असलें तरी प्रत्यक्ष कार्य होण्यासारखी परिस्थिति अजूनही उत्पन्न होत नाही ही खेदाची गोष्ट आहे. हैद्राबादेस निजाम सरकारांकडे गुदरावयाचा खलिता वगैरे सर्व तयार असून मुलाखत मागणारीं पत्रेंहि गेलीं आहेत. परंतु या पत्रांस उत्तरेच न आल्याने पुढे कांहीहि काम करतां आलें नाही. गोंव्याकडील परिस्थितीहि विशेष आशादायक दिसत नाही. किंबहुना परिषदेचा प्रतिनिधि प्रत्यक्ष गोंव्यास जाऊनहि कांही कार्य होऊं शकेल असें गोंव्याच्या जबाबदार स्थानिक पुढारी मंडळीसहि वाटत नाही. तरी पण परिषदेच्या कचेरीकडून प्रयत्न चालू आहेत.

परिषदेचे निधिधारक रा. ब. दा. ग. पाध्ये यांजकडून ट्रस्टफंडाचे हिशेब नागपूरसंमेलनाच्याच वेळीं यावयाचे पण ते आले नव्हते. संमेलनानंतरहि ते अजूनपर्यंत हातीं आलेले नव्हते. यामुळे ते 'पत्रिके'त यापूर्वी प्रसिद्ध करतां आले नाहीत. आता








अनुक्रमणिका

नुकतेंच निधिधारकांचें पत्र आलें असून त्यांत सदर हिशेब आता तयार झाले असून परिषदेचे सन्मान्य हिशेब तपासनीस रा. जि. कृ. परुळकर यांजकडून ते तपासले गेल्यावर कचेरीकडे पाठविण्यांत येतील असा मजकूर आहे.

गेल्या तिमाहींत परिषदेस पुढील नवीन साधारण सभासदांचा लाभ झाला:– ( १ ) रा. ग. ना. आंबेकर, नांदेड, ( २ ) रा. दि. ग. उदगीरकर, नांदेड, ( ३ ) रा. द. गो. वाणी, प्रिंपाळे व ( ४ ) रा. ग. र. वैशंपायन, पुणें.

गतवर्षीं नागपूर साहित्यसंमेलन प्रसंगी बऱ्याच सद्गृहस्थांनी परिषदेच्या कायमनिधीकरिता देणग्या देण्याचे जाहीर केलें होतें त्यांपैकीं परिषदेकडे आतापावेतो रु. १२९८ जमा झाले आहेत.

महाराष्ट्रांतील सुशिक्षित जनतेंत परिषदेस जितके सभासद मिळतील तितकी परिषदेची कार्यक्षमता वाढेल हें उघड आहे. या दृष्टीने कचेरी परिषदेचें प्रचारकार्य करीत आहे; परंतु त्यास यावें तसें यश येत नाही हें सांगितलें पाहिजे.

**किरकोळ**:—ता. १३।६।३४ रोजीं परिषद् व पुण्याची ' महाराष्ट्र शारदा मंदिर ' ही संस्था यांच्यातर्फे श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखाली परिषदेचे एक उपाध्यक्ष कै० श्री. कृ. कोल्हटकर यांच्या मृत्यूबद्दल खेद व्यक्त करण्याकरिता जाहीर सभा किर्लोस्कर नाट्यमंदिरांत भरविण्यांत आली होती. या सभेंत कित्येक वक्त्यांचीं कै० कोल्हटकरांबद्दल गुणवर्णनपर भाषणें होऊन दुखवट्याचा ठराव मंजूर झाला. हा ठराव रीतसर परिषदेतर्फे कै० कोल्हटकरांच्या चिरंजीवांकडे पाठविण्यांत आला.

नियामक मंडळाच्या सभेच्या दिवशींच म्हणजे ता. ५।६।३४ रोजीं नियामक मंडळाची सभा झाल्यानंतर परिषदेच्या कचेरींत परिषदेने एक अनौपचारिक समारंभ घडवून आणिला. पुण्यांत दरसाल उन्हाळ्यांत परस्थ साहित्यभक्त मंडळी येत असतात. तेव्हा या मंडळीच्या गांठीभेटी आणि परस्परविचारविनिमय घडवून आणण्यासाठी या दिवशीं एक अनौपचारिक सभा बोलावण्यांत आली होती. सभेपुढे काम असे कांहीच नव्हतें. या प्रसंगीं पुण्यांतील व परस्थ अशी बरीच मंडळी परिषदेच्या कचेरीस भेट देण्यासाठी आली होती. त्यांत रा. ब. वा. अ. बांबर्डेकर (मुंबई), रा. पु. य. देशपांडे ( उमरावती ), रा. वा. वि. जोशी ( बडोदें ), रा. न. ल. इनामदार ( उमरावती ), प्रो. श्री. व्यं. पुणतांबेकर ( बनारस ), प्रो. वा. वि. मिराशी (नागपूर), इत्यादि मंडळींचा प्रामुख्याने उल्लेख केला पाहिजे. यांशिवाय नियामक मंडळाच्या सभेस आलेल्या मंडळींत डॉ. शं. पु. आघारकर ( कलकत्ता ), रा. र. कृ. पाटणकर ( राजापूर ), रा. सा. र. ल. जोशी ( मुंबई ), श्री. ना. म. भिडे ( भोर ), श्री. नी. शं. नवरे ( सोलापूर ), प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन ( कोल्हापूर ), प्रो. श्री. ना. बनहट्टी ( नागपूर ), वगैरे मंडळी होतीच. नुकत्याच झालेल्या कै. कोल्हटकरांच्या मृत्यूची








अनुक्रमणिका

छाया सभेतील वातावरणावर पडली होतीच. तरी पण परिषदेबद्दल आस्था बाळगणारी मंडळी एके ठिकाणीं जमली हा फायदा कमी नाही.

ता. १८।८।१९३४.

चिटणीस, म. सा. परिषद्

---

# स्त्रियांच्या म्हणी

[ मागील अंकावरून पुढे ]

( ३४० ) सख्ख्या सासूचा कापला कान, मावससासू मागती मान.
( ३४१ ) आजुबाजूचें सारी इळूंच मुसळ मारी.
( ३४२ ) कुणाचाहि असो, ओसरीला बसो.
( ३४३ ) आपले नाहीं घड, शेजाऱ्याला फड.
( ३४४ ) भटाची मुंज, तटाचं बारसं.
( ३४५ ) टामणटिका, डोक्यात लिखा.
( ३४६ ) तोंड आले, ( आळा घातला तर ) तर बाळ खेळे.
( ३४७ ) सुगावलें तर सूत, नाहींतर पिंपळावरचें भूत.
( ३४८ ) फाटक्याला शिवावें किती, दुबळ्याला द्यावें किती.
( ३४९ ) आण रे मेल्या पायली, मी करते बायली.
( ३५० ) शेजेगांवचा माळी, आठ दिवसाला पाळी.
( ३५१ ) पंचपक्वान्नाचें जेवण, अन् गोमुत्राचें आचमन.
( ३५२ ) तरण्याचे झाले कोळसे, म्हाताऱ्याला आले बाळसें.
( ३५३ ) आज मरा, अन् उद्यां धर्म करा.
( ३५४ ) भांडते असावें, पण बुडते नसावे.
( ३५५ ) खऱ्याचें खोटें, लबाडाचें तोंड मोठें.
( ३५६ ) भिकारी ते भिकारी, अन् ओकारी.
( ३५७ ) आधीं न मधीं शिमगा करी.
( ३५८ ) काणा कैपती ( मतलबी ) आंधळा हिकमती.
( ३५९ ) पडक्या भिंतीला लिंपूं किती, म्हातारा नवरा जपूं किती.

नीलकंठ शंकर नवरे, सोलापूर

३४३



# अंदाज-पत्रक

## ( एप्रिल १९३४ ते मार्च १९३५ करितां )

### जमा

| | | |
|---|---|---|
| ४५९-११-९ | शिल्लक | |
| | ३७१-१५-३ | खजिनदार |
| | ५७-१०-३ | सुं. भा. वैद्य |
| | ३०-२-३ | चिटणीस |
| | ४५९-११-९ | |
| ६४०-०-० | देणगी | |
| | २००-०-० | कोल्हापूर |
| | २००-०-० | नागपूर सं. |
| | २४०-०-० | श्रीमंत इचलकरंजीकर |
| | ६४०-०-० | |
| ११०० ०-० | वर्गणी | |
| | १०००-०-० | साधारण |
| | १००-०-० | पत्रिका |
| | ११००-०-० | |
| ६००-०-० | व्याज | |
| २७९९-११-९ | एकूण जमा. | |

### खर्च

| | | |
|---|---|---|
| २२१-३-० | देणें | |
| | २१६-७-० | आर्यसंस्कृति |
| | ४-१२-० | किरकोळ |
| | २२१-३-० | |
| ९२०-०-० | पत्रिका | |
| | ८००-०-० | छपाई |
| | १२०-०-० | टपाल |
| | ९२०-०-० | |
| ८९०-०-० | कचेरी खर्च | |
| | ३६०-०-० | पगार |
| | १५०-०-० | भाडें कचेरी |
| | ५०-०-० | किरकोळ |
| | ५०-०-० | लिखाई |
| | ५०-०-० | सादिल |
| | १००-०-० | किरकोळ छपाई |
| | १३०-०- | टपाल |
| | ८९०-०-० | |
| ५००-०-० | प्रचार खर्च | |
| | १५०-०-० | प्रचार |
| | ३५०-०-० | हैद्राबाद गोंवें शिष्टमंडळ |
| | ५००-०-० | |
| १००-०-० | सामान | |
| २६३१-३-० | एकूण खर्च. | |





अनुक्रमणिका

# निवेदन

[ संपादकीय ]

गेले कित्येक महिने आमच्या मराठी वाङ्मयाचें शोकपर्वच चालू आहे म्हटलें तरी चालेल ! त्यामुळे मनाला एक प्रकारचा उदासपणा वाटतो. त्यांतून त्रैमासिकांत अणि तेंहि मागासलें म्हणजे ही शोकगंगा बांध घातल्याप्रमाणे तुंबून राहते ! एकामागून एकसारख्या मृत्युवार्ताच कानीं येत गेल्या ! दिवंगतांचें दर्शन चित्रद्वारां घडावें म्हणून थोडी खटपट केली तों दिवंगतांची संख्या वाढतच गेली व आमची इच्छा अपूर्णच राहिली ! अस्तु ! अस्तंगत साहित्यभक्तांना ही आमची बाष्पांजलि प्रणामपूर्वक सादर असो !

* * * *

या दिवंगत साहित्यिकांचें किंचित् गुणवर्णन करणें क्रमप्राप्त आहे.

* * * *

कै. बापुराव आंबेकर हे पुण्यांतले एक झांकलें माणिक होतें. ज्ञानप्रकाशसारख्या वर्तमानपत्राचे तेच संपादक म्हणून आज सुमारें वीस पंचवीस वर्षें काम करीत होते. त्यांचें नांव कोठें तितकें प्रसिद्ध नसे; परंतु ज्ञानप्रकाशपत्राला ज्यावेळीं काव्यशास्त्रविनोदाची पुरवणी जोडली गेली त्यावेळेपासून बापुरावांची चमक साहित्यिकांच्या नजरेंत विशेष प्रकारें सहजच भरूं लागली. त्यांचीं मार्मिक परीक्षणें रसिक वाचकांना फार प्रिय झालीं. त्या परीक्षणांवरून बापुरावांचा बहुश्रुतपणा, गुणदोषविवेचकशक्ति, आणि सुबोध व प्रौढ भाषापद्धती यांचा स्पष्ट अनुभव वाचकांस आल्यावांचून राहत नसे.

लेखांवर नांवें घालणें, किंवा सभासंमेलनांत येणें यांचें बापुरावांस वावडेंच होतें म्हणाना ! त्यांची कळी खुलावयाची मोजक्या मित्रमंडळींत, बैठकींत ! कोटया, चिमटे, विनोद यांची खैरात ते या बैठकींतून भरपूर करीत.

बापुराव मनाचे प्रेमळ असत तसेच ते गातहि फार गोड. साधारपणे ते ठाणबंदी होते तथापि त्यांचेजवळ माहितीचें भांडार भरपूर असे. बापुरावांच्या मृत्युमुळे पुण्यांतील ' काव्यशास्त्रविनोदाचें ' एक आरामस्थळ गेलें !!

* * * *

साहित्याचार्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्या मृत्युमुळें सारा महाराष्ट्र हळहळला ! गेल्या तीसचाळीस वर्षांत मराठी साहित्यक्षेत्रांत जे कित्येक दैदिप्यमान तारे चमकून गेले त्यांत श्रीपाद कृष्ण हे पहिल्या प्रतींत मोडतात. नाटककार व टीकाकार या उभय








अनुक्रमणिका

दृष्टींनी त्यांचा अधिकार मोठा होता. त्यांनी आपली अशी एक पृथक् परंपरा निर्माण केली. 'श्रीपादांची कलावती वाणी' रसिकांच्या विहारवाटिकेमधली मंजुळ कोकिळाच होती. गोविंदाग्रज, माडखोलकर, खांडेकरप्रभृती अनेक साहित्यिक या श्रीपादपरंपरेंतलेच मणि होत.

श्रीपाद कृष्ण हेहि स्वभावाने प्रेमळ आणि जवळ येऊं पाहणाऱ्या साहित्यिकांवर पित्यासारखी माया करीत. धंदा वकिलीचा, गती ज्योतिर्गणितांत पण मन त्यांचे रमे कथा-काव्यनाटकांत ! महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचे ते पुण्यास अध्यक्ष होते आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ते उपाध्यक्ष होते. त्यांच्या मृत्युमुळे मराठी साहित्याच्या अस्मानांतील एक ज्योतिःपुंज निखळून पडला यांत शंका नाही. त्याने दिलेलें तेज मात्र लुप्त होणार नाही. त्या तेजाने मराठी साहित्य नेहमी चमकत राहील !

* * * *

तिसरा दुःखद मृत्यु श्रीमंत सरदार खंडेराव चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब मेहेंदळे यांचा ! हेहि श्रीपाद कृष्णांच्या पिढींतले, त्यांच्याच वयाचे. पुण्यांतील अग्रणी विद्वानांत यांची यथार्थपणें गणना करण्यांत येत असे. वेचक संस्कृत, इंग्रजी व मराठी ग्रंथांचा संग्रह त्यांचेजवळ मोठा असे आणि ते तो फार जपून ठेवीत ! त्यांचा किताबखाना हाच त्यांचा जवाहीरखाना होय ! आपल्या संपत्तीचा असा सद्व्यय त्यांनी केला. ग्रंथ घेणारे पुष्कळ असतात परंतु त्यांचा आस्वाद घेऊन आपल्या बुद्धीला खुराक पुरविणारे फार विरळ असतात. अशा विरळ पुरुषांत तात्यासाहेबांची गणना असे. वाचलेलें पक्कें वाचावयाचें ही भांडारकरी पकड त्यांचें मनावर दृढ बसलेली असे. त्यामुळे तात्यासाहेब हे चालताबोलता संदर्भकोश होता म्हटलें तरी चालेल. व्युत्पत्ति, इतिहास, तत्त्वज्ञान अशा गहन विषयांत तात्यासाहेबांची उत्तम तयारी. एवढे 'दुर्वास' राजवाडे परंतु त्यांनी देखील तात्यासाहेबांसारखा विद्वान आढळावयाचा नाही असें म्हणावें ! दुर्दैव इतकेंच कीं, एवढी विद्वत्ता खाणींतल्या रत्नांप्रमाणेच अप्रकटच राहिली. आपण जवळ जाऊन खोदावें तेव्हा काय हातीं लागेल तेवढेंच !

राजवाडे व मेहेंदळे यांनी परस्परांच्या साहाय्याने पुण्यास शके १८३२ सालीं भारत इतिहास-संशोधक-मंडळाची स्थापना केली. दूरवर विचार करणारास ही मोठी क्रांतिकारक गोष्ट घडली असेंच दिसल्याशिवाय राहणार नाही. संथपणें परंतु सातत्याने, शास्त्रीय पद्धतीने, तसेंच व्यापक दृष्टीने इतिहाससाहित्याची जेवढी जुळणी महाराष्ट्रांत या मंडळाच्या स्थापनेमुळे झाली तेवढी कशानेहि झाली नाही आणि या सर्व सामुग्रीचा यथाशास्त्र परिपाक होण्याची वेळ जेव्हा येईल तेव्हा या प्रयत्नाचें महत्त्व संपूर्णतया ध्यानीं आल्याशिवाय राहणारहि नाही. बापुराव आंबेकर हे जसे काव्यशास्त्रविनोदाचे तसे तात्यासाहेब हे काव्यशास्त्रविद्वत्तेचें पुण्यांतलें माहेरघर होतें. कोल्हटकर व मेहेंदळेप्रभृतींच्या मृत्युमुळे साठी उलटलेली वृद्ध साहित्यिकांची आणि महाराष्ट्र







अनुक्रमणिका

पंडितांची पिढी जात चालली, नव्हे बहुतेक गेलीच, हें पाहून चित्तास चटका बसल्या-शिवाय राहात नाही!

* * * *

मुंबईचे वयोवृद्ध ग्रंथकार श्री. कृष्णाजी अर्जुनराव केळुसकर यांच्या मृत्युमुळे मराठींतील एक कसलेला लेखक नाहीसा झाला! गौतमबुद्धांचें चरित्र हा त्यांचा जुना ग्रंथ सोडला तरी श्रीछत्रपती शिवाजी महाराजांचें त्यांनी लिहिलेलें चरित्र हेंच छत्रपतींचें मराठींतील **पहिलें मोठें चरित्र** होय यांत संशय नाही! रा. केळुसकर यांची भाषा प्रौढ, सरळ व शुद्ध अशी असे. अध्यात्मविषयांचीहि त्यांस अंतरी आवड होती. सुमारें चाळीस वर्षें प्रामाणिकपणाने शिक्षकाचा पवित्र व्यवसाय करून त्यांनी लौकिक मिळविला आणि मिळालेल्या अल्पशा फुरसुतीचा विनियोग लेखनांत केला. अलीकडे बरीच वर्षें ते थकल्यामुळे विश्रांतीच घेत होते. त्यांतून त्यांस बाहेर काढून मुंबईच्या नगरसाहित्यसंमेलनाचे अध्यक्षस्थान देऊन त्यांचा जो गौरव करण्यांत आला तो अत्यंत उचित असा झाला! दुर्दैव इतकेंच कीं, तेवढीहि दगदग त्यांच्या प्रकृतीला सोसवली नाही आणि त्यांचा अशक्तपणा वाढून त्यांस मृत्यूचें स्वाधीन व्हावें लागलें. त्यांच्या लेखांचें एक पुस्तक काढून त्यांचें अनुरूप स्मारक त्यांच्या अभिमान्यांनी करण्याचें योजिलें आहे तें सर्वस्वी स्तुत्य आहे.

* * * *

मृत्यूच्या सर्वभक्षकतेला दोन होतकरू संपादकहि बळी पडले हें ऐकून कोणासहि दुःख वाटेल. एक संपादक म्हणजे 'कलादर्शा'चे रा. चौगुले व दुसरे म्हणजे नागपुरच्या वागीश्वरीचे श्री. आण्णाजी बोबडे. या उभय संपादकांच्या प्रयत्नांनी मराठी वाङ्मयाची गोडी नव्हती तेथे उत्पन्न केली होती. विशेषतः 'वागीश्वरी' सारखें उच्चप्रतीचें मासिक चालविणें हें कांही सोपें काम नाही. रा. बोबडे हे गुणी कवीहि होते आणि त्यांच्या 'कवितांचा संग्रह' बि. भू. घुलेशास्त्री यांनी सुचविलेप्रमाणे अवश्य प्रसिद्ध झाला पाहिजे.

* * * *

पत्रिकेच्या नवीन धोरणाप्रमाणे पुस्तकांची यादी देण्याची योजना करण्याच्या तजविजीत आम्ही होतों. परंतु पुण्यास केसरी-मराठा संस्थेमार्फत 'सह्याद्री' नांवाचें जें मासिक सुरू व्हावयाचें आहे त्यांत प्रकाशकांच्याकडून व लेखकांकडून अशाच प्रकारची माहिती मागविल्याचें दिसल्यावरून थोडी वाट पहावी असें आम्हीं ठरविलें आहे. तसेंच बडोदा येथील सुविख्यात सेंट्रल लायब्ररीमधील एक व्यासंगी सेवक, आमचे मित्र रा. दंडवते यांनी 'अभिप्राय संग्राहक' नांवाचें एक नवीत नियत-कालिक याच कार्यासाठी वाहिलेलें असें सुरू करण्याचें ठरवून त्याचा नमुना अंकही नुकताच प्रसिद्ध केला आहे. यावरून आम्ही सुचविलेल्या विषयाकडे सक्रिय लक्ष्य पोंहोचविण्याचे उद्योग स्वतंत्रपणाने आरंभिले जात आहेत हें पाहून आम्हास आनंद








अनुक्रमणिका

होणें साहजीक आहे. तथापि या उपक्रमांच्यामुळे आम्हाला आमचें नवें धोरण अमलांत आणण्याचें कामीं ठरविलेल्या योजनेंत कांहीं बदल केला पाहिजे असें वाटूं लागलें आहे.

* * * *

बडोदा संमेलनाच्या चालकांनी यंदा संमेलनांतील कार्यक्रमाची मांडणी अधिक व्यापक करण्याचा संकल्प केलेला आहे. "हिंदी, गुजराथी, बंगाली, कानडी वगैरे भाषांच्या अधिकारी संस्थांशी विचारविनिमय करून मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी शक्य ती योजना ठरविणें आणि बृहन्महाराष्ट्रांतील महाराष्ट्रीय संस्थांशी वाङ्मयिक व सांस्कृतिक प्रश्नांचा विचारविनिमय करणें," तसेंच "बृहन्महाराष्ट्र व महाराष्ट्रांतील साहित्य संस्थांची नोंद करून त्यांजशी सहकार्य करणें" इत्यादि कामें एका सहकारसमितीकडे बडोदें संमेलनाच्या व्यवस्थापकांकडून सोंपविण्यांत आली आहे. तेव्हां अनायासें आमच्या योजनेपैकीं बऱ्याच बाबींची निदान कच्ची तयारी तरी या उपक्रमांमुळे होऊन जाईल व त्याचा लाभ बडोदें येथील संमेलनाच्या चालकांकडून पत्रिकेस मिळेल अशी आम्हास उमेद आहे.

या सर्व गोष्टींमुळे आम्ही आमच्या नव्या योजनेचीं पावलें जरा सावकाशच टाकीत आहों. खुद्द आमचेजवळ याबद्दलची सामुग्री जुळवावयाची आहे; आणि एकाच प्रकारचें काम तिबार होण्यापेक्षा जर एका हातीं सुव्यवस्थितपणें सातत्यानें होईल तर तें तसें होऊं देणें आम्हास इष्ट वाटतें. सहविचारिणीसभा बडोदें, व केसरी-मराठा संस्था, पुणें या दोन्ही संस्था समर्थ आहेत. अशा सुसंघटित संस्थांकडून ग्रंथांच्या याद्या प्रसिद्ध होणें, साहित्यिक नोंदी प्रसिद्ध करणें वगैरे कामें उरकलीं गेलीं तर परिषदेवरील तेवढ्याच कामाचा भार कमी होईल; व म्हणून थोडी सबूरी करणें गैर ठरणार नाहीं. परिषदेकडूनच हा कार्यभाग उरकणें प्राप्त झाल्यास त्याची जुळवाजुळव जरा स्वतंत्रपणेंच करावी लागेल. परिषदेचे अभिमानी याचा विचार अवश्यमेव करतील अशी आम्हास खात्री आहे.

* * * *

ग्वाल्हेरचे कविवर्य भास्कररावजी तांबे यांच्या षष्ट्यब्दिपूर्तिनिमित्त बऱ्याच ठिकाणीं गौरवसमारंभ झाले. खुद्द ग्वाल्हेर येथे परिस्थिति अनुकूल न राहिल्यामुळे हा समारंभ लांबणीवर टाकावा लागला आहे. पण आम्हास खात्री आहे कीं, ज्यावेळीं तो साजरा होईल त्यावेळीं या उणीवेचा सव्याज वचपा भरून काढण्यांत येईल. भास्कररावजींच्या कवितेंत कारुण्याची कोंवळीक आणि शृंगाराची नव्हाळी आपल्या अपूर्वाईने तळपत आहेत असें म्हणण्यास हरकत नाही. त्यांची अंतर्बाह्य प्रेमळवृत्ति आणि तिचा अनुरूप आविष्कार हीं त्यांस व महाराष्ट्रास सारखींच भूषणभूत होण्याजोगीं आहेत. परमेश्वरापाशी भास्कररावजीस जें दीर्घायुष्य महाराष्ट्रीय रसिक जनतेने मागितलें आहे, तें त्यांस स्वतःस लाभदायक व सुखकारक व्हावें, येत-






अनुक्रमणिका

ढेच नव्हे, तर महाराष्ट्रासहि भास्कररावजींच्या विविध कलाविलासाने संस्मरणीय व्हावें अशी आमची इच्छा आहे.

* * * *

नुकतेच कै. केळूसकर यांचे अध्यक्षतेखाली मुंबईस* एक स्थानिक साहित्य-संमेलन भरलें आणि दुसरें सांगलीस भरण्याचें घाटत आहे. बडोदें, नगर, नाशीक, इंदूर, उज्जैन, ठाणें (कोंकण) वगैरे बऱ्याच ठिकाणीं प्रांतिक व स्थानिक साहित्य-संमेलनें अलीकडे भरूं लागलीं आहेत हें वाढत्या साहित्यप्रेमाचें स्पष्ट चिन्ह आहे आणि म्हणून या सर्व प्रयत्नांचे आम्ही मनापासून अभिनंदन करतों. या प्रयत्नांनी मराठी साहित्यप्रीतीची लाट महाराष्ट्रांत दूरदूरच्या ठिकाणीं जाऊन पोहोचेल आणि सारा महाराष्ट्र साहित्याच्या चांदण्यांत सुस्नात होईल. साहित्यप्रीतीचें स्नान करून उजळलेला आमचा सारा समाज मग मोठ्या भक्तिभावाने साहित्याची उपासना करूं लागेल आणि तेव्हाच आमचे मनोरथ पूर्ण होतील. परिषदेचें उद्दिष्ट तरी तेंच आहे; आणि जागजागीं स्थापन होणाऱ्या साहित्यसंस्था परिषदेशी सहकार करून मराठी भाषेच्या आणि वाङ्मयाच्या अडचणी दूर करून त्याच्या प्रसारास साहाय्य करतील असा आम्हास भरवसा आहे.

* * * *

आम्हास कळविण्यास आनंद वाटतो कीं, भोरचे उदार व विद्याप्रेमी अधिपति श्रीमंत बाबासाहेब पंडित पंतसचीव यांनी भोर गादीचे मूळ संस्थापक, प्रख्यात मराठी मुत्सद्दी व वीर श्री. शंकराजी नारायण यांच्या पुण्यतिथीच्या निमित्ताने दरसाल कार्तिकांत रु. ३०० मराठी ग्रंथकारांस पारितोषकें देण्यासाठी म्हणून खर्चण्याचा संकल्प केला आहे. प्रथम सालीं भा. इ. सं. मंडळातर्फे प्रसिद्ध झालेल्या व श्री. वा. सी. बेंद्रे यांनी संपादित केलेल्या 'राजाराम चरितम्' या नव्या ऐतिहासिक माहितीने युक्त ग्रंथाची निवड करण्यांत आली होती. तदनंतर यंदाच्या सालीं मुधोळ घराण्याचा इतिहास या उत्कृष्ट ग्रंथाचे संपादक आणि महाराष्ट्रातील इतिहासाचे सूक्ष्म व खोल अभ्यासक आमचे मित्र रा. द. वि. आपटे यांस रु. १२५ आणि नागपूरचा इतिहास या सुविस्तृत व प्रशंसनीय इतिहासाचे लेखक रा. यादवरावजी काळे, आणि अत्यंत परिश्रमपूर्वक अनेक थोर पूर्वजांच्या हस्ताक्षरांची ओळख करून देणाऱ्या पुस्तकाचे कर्ते आमचे मित्र रा.

* मुंबईप्रमाणेच इंदूर मुक्कामीं नुकतेच बडोद्याचें विद्वान साहित्यसेवक, आमचे मित्र रा. दा. ना. आपटे यांचे अध्यक्षतेखाली मध्यभारतीय मराठी साहित्यसंमेलन भरलें आणि 'मालव साहित्या'-चा विविध चित्रलेखादिकांनी नटलेला भरदार असा साहित्य अंकहि प्रसिद्ध झाला आहे. या समारंभास खुद्द इंदूरचे महाराज साहेब व राजघराण्यांतील मंडळी हजर होती. त्याचप्रमाणे उज्जयिनी येथे प्रो. द. वा. पोतदार यांचे अध्यक्षतेखाली तेथील स्थानिक साहित्यमंडळाने आपला वार्षिक उत्सव साजरा केला. कोंकणसंमेलन मात्र ठाण्यास जें एकदा भरलें आणि झोपीं गेलें तें अद्याप झोपेंतच आहे! रा. वरेरकरप्रभृति या संमेलनाचे अभिमानी इकडे लक्ष देतील अशी आशा आहे.





आबा चांदोरकर या दोघांस अनुक्रमें १००–७५ याप्रमाणे बक्षिसें देण्यांत आलीं. श्रीमंतांचा उपक्रम स्तुत्य व अभिनंदनीय असा आहे. अशातऱ्हेचे सर्व उपक्रम म. सा. परिषदेच्या सल्ल्याने केल्यास त्यांत सूसूत्रता येईल. या आमच्या सूचनेचा विचार अवश्य होईल अशी आम्ही आशा बाळगतों.

* * * *

शके १८५७ च्या आषाढांत भा. इ. सं. मंडळ या संस्थेस २५ वर्षें पुरीं होत असल्याने तिचा रौप्य महोत्सव साजरा करण्याचें मंडळानें योजिलें आहे. त्या योजनेनिमित्त अखिल भारतीय इतिहास परिषद् भरविण्याचेंहि ठरविलें आहे. या दोन्ही योजनांबाबत अधिक सविस्तर माहिती आम्ही पुढे देऊं.

* * *

मुंबई मराठी ग्रंथालयाचे एक संस्थापक व निस्सीम सेवक रा. अं. गो. पुणतांबेकर यांचा मुंबईस नुकताच सन्मान करण्यांत आला हें योग्य झालें. प्रो. काणे, रावब. बोले वगैरे अनेक भिन्न मतांच्या लोकांच्या मनांत रा. नथोबा पुणतांबेकर यांच्या निस्सीम समाजसेवेबद्दल किती आदर आहे हें यायोगें दिसून आलें. मुंबईचें मराठी ग्रंथालय ही महाराष्ट्राने अत्यंत अभिमान बाळगण्याजोगी संस्था आहे. तिला सर्व प्रकारचें साहाय्य करणें व तिची अभिवृद्धि करणें हें सर्व लोकांचें कर्तव्य आहे.

* * * *

नागपूर संमेलनाचा अहवाल नुकताच हातीं आला आहे. कोल्हापूर संमेलनाचा अहवाल कधीं प्रसिद्ध होणार ?

---





अनुक्रमणिका

# नियामक मंडळ

## (१) अधिकारपरत्वें सभासद

१ श्री. स. मा. वि. किबे, (अध्यक्ष), इंदूर
२ प्रो. वा. म. जोशी, (उपाध्यक्ष), पुणें
३ श्री. न. चिं. केळकर, ( ,, ), पुणें
४ प्रो. पां. वा. काणे, (उपाध्यक्ष), मुंबई
५ श्री. चिं. वि. वैद्य, ( ,, ), मुंबई
६ श्री. श्री. कृ. कोल्हटकर (,,), जळगांव

## (२) स्वीकृत सभासद

७ श्री. चिं. ग. कर्वे, पुणें
८ प्रो. दे. द. वाडेकर, पुणें
९ प्रि. ध. रा. गाडगीळ, पुणें
१० प्रो. रा. श्री. जोग, सांगली
११ श्री. य. रा. दाते, पुणें
१२ प्रो. दा. ग. पाध्ये, नाशिक
१३ प्रि. प्र. के. अत्रे, पुणें
१४ श्री. रा. दा. देसाई, पुणें
१५ श्री. रा. ग. हर्षे, पुणें
१६ श्री. द. श. तुळजापूरकर, मुंबई

## (३) प्रादेशिक सभासद

१७ रे. भा. कृ. उजगरे, सासवड
१८ श्री. शं. वा. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी
१९ श्री. बि. द. घाटे, अहमदाबाद
२० श्री. नी. शं. नवरे, सोलापूर
२१ श्री. दे. ना. टिळक, नाशिक
२२ श्री. वा. ना. फडणीस, जळगांव
२३ श्री. शं. श्री. देव, धुळें
२४ श्री. ना. गो. चापेकर, बदलापूर
२५ श्री. ज. वि. लेले, अलिबाग
२६ श्री. र. कृ. पाटणकर, राजापूर
२७ श्री. कृ. पां. कुलकर्णी, सातारा
२८ प्रो. द. वा. पोतदार, पुणें
२९ प्रो. वा. गो. मायदेव, पुणें
३० श्री. शं. के. कानेटकर, फलटण
३१ श्री. श्री. दा. सातवळेकर, औंध
३२ श्री. ना. म. भिडे, भोर
३३ श्री. कृ. प्र. खाडिलकर, मुंबई
३४ श्री. ज. र. घारपुरे, मुंबई
३५ श्री. गं. दे. खानोलकर, मुंबई
३६ श्री. के. ना. काळे, मुंबई
३७ श्री. वा. ल. चिपळूणकर, अकोला
३८ डॉ. भा. म. टेंबे, यवतमाळ
३९ श्री. बा. ग. खापर्डे, उमरावती
४० श्री. या. मा. काळे, बुलढाणा
४१ प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूर
४२ प्रो. श्री. ना. बनहट्टी, नागपूर
४३ प्रो. ना. के. बेहेरे, नागपूर
४४ श्री. के. वि. फणसे, सिहोरा
४५ श्री. गो. अ. ओगले, नागपूर
४६ श्री. दे. ल. महाजन, नांदेड
४७ श्री. का. सी. वैद्य, हैद्राबाद
४८ श्री. त्रिंबकराजा बहादुर, हैद्राबाद
४९ श्री. पां. वा. जोशी, हैद्राबाद
५० प्रो. श्री. रा. पारसनीस, सातारा
५१ प्रो. मा. लिं. पटवर्धन, कोल्हापूर
५२ श्री. गो. शि. उपळेकर, कोल्हापूर
५३ श्री. द. व्यं. पै, मडगांव
५४ डॉ. के. वा. साठे, बेळगांव
५५ श्री. भा. रा. पटवर्धन, धारवाड
५६ दि. ब. अ. बा. लठ्ठे, बेळगांव
५७ प्रो. चिं. वि. जोशी, बडोदें
५८ श्री. ग. वा. मावळणकर, अहमदाबाद
५९ रा. सा. र. छ. जोशी, सुरत
६० सौ. कमलाबाईसाहेब किबे, इंदूर
६१ प्रो. वा. गो. ऊर्ध्वरेषे, इंदूर
६२ श्री. वि. सी. सरवटे, इंदूर
६३ प्रो. गं. गो. कानेटकर, जबलपूर
६४ प्रो. प्र. वा. बापट, ग्वाल्हेर
६५ प्रो. ब. ग. खापर्डे, बनारस
६६ श्री. ग. गं. जांभेकर, पुणें
६७ डॉ. शं. पु. आघारकर, कलकत्ता
६८ सौ. ताराबाई सहस्रबुद्धे, मद्रास



# महाराष्ट्र साहित्यांत नवीन उत्कृष्ट भर

## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचीं पाहिलीं चार वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षवार बांधलेलीं चार पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, ऐतिहासिक, चरित्र, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक, शंकाचर्चा, सामाजिक इत्यादि विषयवार सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, इतिहास यासारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**भाषिक**—प्राकृत, मराठीचे कालिक व प्रांतिक भेद, म्हणी; पारिभाषिक शब्द; विविध शब्दसंग्रह; व्याकरण; व्युत्पत्ति; लिपी; जुने गद्य—पद्य इ०

**सामाजिक**—जुन्या कथा; गाणीं; सामाजिक टाचणें; खेळ; तोडगे; व्रतें; संस्कारपद्धती; जुन्या चालीरीती; जातींची माहिती इ०

**निबंध**—कृषिशास्त्र; भूघटना; आयुर्वेद; तत्त्वज्ञान; वेद; काव्य इत्यादि विषय.

**ऐतिहासिक**—अलीबहादरांस पत्रें; शिलालेख; शालिवाहन शक; पत्रें; हकीकत तालुके रायगड; पेशवाईच्या सावलींत; बोधले घराणें बखर इ०

**चरित्र**—अश्वघोषाचें बुद्धचरित्र; वि. का. राजवाडे; वि. कों. ओक इ०

**ग्रंथ**—निरुक्ताचें भाषांतर; मराठी वाङ्मयाचा इतिहास; भांडीरभाषा व्याकरण.

**शंकाचर्चा**:—यांत शब्द, वाक्यरचना, प्रचार, व्युत्पत्ति, गाणीं इ. अनेक गोष्टींवर शंकाचर्चा आल्या आहेत.

**पुस्तकपरीक्षण**:—कांही महत्त्वाच्या ग्रंथांवर पांडित्यपूर्ण विस्तृत टीका असून हा भाग परीक्षणक्षेत्रांत अगदी नवीन आहे. मराठी वाङ्मयाचें एक स्वतंत्र दालन यामुळे नवीन उघडलें गेलें आहे.

**किंमत**:—सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह. दर वर्षाच्या पुस्तकास ३ रुपये; एकदम पहिल्या चार वर्षांचीं पुस्तकें १० रु. स. ट. ह. निराळा.

**वि. सू.**—पांचव्या वर्षाच्या पुस्तकांच्याहि बांधीव प्रती तयार आहेत. परंतु या प्रतींस प्रत्येकीं ४ रुपये पडतील. ट. ख. वेगळा.

चिटणीस, म. सा. परिषद, पुणें.

आर्यसंस्कृति-मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरस्ता, पुणें येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनीं छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत (१९६ [७९] सदाशिव पेठ, पुणें २) परिषदेकरिता ना. गो. चापेकर यांनी प्रसिद्ध केलें.





अनुक्रमणिका